


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या / नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ७. सप्टंबर, सन १८८४. अंक ९.

हें मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें.

किंमत ८ आणे.



अनुक्रमणिका

## पोंच.

### सन १८७८ ते १८८३ पैकीं.

| | रु. | आ. | | रु. | आ. |
|---|---|---|---|---|---|
| श्री० रा० वि० ग० किबे......... | ११ | ० | रा० रा० से० ने० ला० बेळगांव... | ८ | १२ |
| रा० सा० व्यं० रं० कट्टी......... | ४ | ६ | ,, ,, सिं० मा० देव......... | २४ | ० |

### सन १८८४ पैकीं.

| | रु. | आ. | | रु. | आ. |
|---|---|---|---|---|---|
| श्री० रा० वि० ग० किबे......... | ४ | ६ | रा० रा० ज० मो० पिंगळे......... | ४ | ६ |
| रा० सा० व्यं० रं० कट्टी......... | १ | ० | ,, ,, से० ने० ला० वडूज...... | २ | ६ |
| रा० रा० ना० बा० मराठे......... | ४ | ६ | ,, ,, अं० चि० दामले...... | ४ | ६ |
| ,, ,, से० ने० ला० नगर...... | २ | ३ | ,, ,, ना० वि० अभ्यंकर...... | ३ | ६ |
| ,, ,, र० रा० भागवत ........ | ४ | ६ | ,, ,, सिं० मा० देव.......... | ४ | ० |

---

## विषयक्रम.



---

## वर्गणीदारांस सूचना.

### अवश्य लक्ष देणें.

☞ वि० वि०. यापुढें काव्येतिहास–संग्रहासंबंधानें पत्रव्यवहार, मनीआर्डरी वगैरे पाठविणें त्या, म्यानेजर काव्येतिहास–संग्रह आलीबाग जि० कुलाबा या पत्त्यावर पाठवाव्या. हे विनंती.

काव्येतिहास-संग्रह-व्यवस्थापक.

अनुक्रमणिका

मोत्यांचा तुरा व जडावाची कंठी, व शुभ्रवर्ण ऐरावतीतुल्य हत्ती, मुलतानी तरकैश कमाना दोन, येणेंप्रमाणें वकिलाबरोबर देऊन सदाशिवपंत भाऊंच्या लष्करांत आले.

वकील रवाना केल्यानंतर अबदल्ली व सुजातदौले व मनसूर अल्ली या त्रिवर्गांनीं फौजेसहवर्तमान जीवित्वाचा संकल्प करून, दोन लक्ष सेनासहित तोफखाना मागें टाकून पांच सातशें नावांचा पूल बांधोन लष्कर तमाम उतरूं लागलें. ते समयीं तेथें बहुत मारामार जाहली. बारग्यांकडील तोफखाना सुरू जाहल्यामुळें इराणीकडील लोक फारच जायां जाहले. परंतु तितुका अग्नीचा पर्जन्य पिऊन, लढाईचा गुंमान न धरितां, इराणीकडील फौज दरोबस्त यमुना उतरून दक्षणतीरास आली. मागें कौरव पांडवांचें युद्ध जाहले तें पुराणोक्त थोर वक्ते सांगतात आणि श्रोते ऐकतात. तें वर्तमान प्रत्यक्ष पहाणें प्राप्त जाहलें. कुरुक्षेत्रीं पश्चमेकडे इराणीकडील सरदार फौजेनिशीं व पूर्वेकडील बाजूस सदाशिवपंत बहादर सेनासहवर्तमान उभे राहिले. अघाडी पिछाडीस गोठास गोट भिडले. इराणी दगेखोर म्हणून सदाशिवपंत सावध रीतीनें राहिले. कामाठी व बेलदार आणून लष्कराभोंवती खंदक रुंद पंधरा हात व उंच दहा हात याप्रमाणें तयार केला. सर्व तोफखाना लष्कराभोंवता पसरून रात्रंदिवस सावध राहिले. कोणी युद्धास प्रवर्तेना. दोन महिने पर्यंत मुक्काम पडला. लष्करांतून तफावतीनें मुक्काम करावा तो न करितां इराणी हांवभरी होऊन पिच्छा पुरवूं लागला. याजकरितां पेशवे बहादूर हटातटानें इराणीच्या लष्करा जवळच राहूं लागले. मुलूख अगदीं वीस पंचवीस गांवपर्यंत बेगर्द बेचिराख जाहला. दाणावैरण मिळेनाशी जाहली. सदाशिवपंतावर मोठा तवईचा वक्त गुजरला.

[ तेव्हां ] प्रथम सदाशिवपंतांनीं आपली फौज व सरदार तयार करून गोठ

---

१६. तर्कशकमान-तर्कश=तूणीर, बाणांचा भाता. कमान=शिंग लववून केलेलें धनुष्य, कमठा. 'शार्ङ्ःकमानमित्युक्तं' तूणीरस्तर्कशः° ' राजव्यवहारकोश.

१७. जीवित्वाचा संकल्प करून=जीवावर उदार होऊन.

१८. 'बारगे' 'गनीम' असें परदेशीय लोकांनीं आह्मास ह्मटलें त्यांत विशेष नाहीं. पण आमच्याच लोकांनीं आपणास असें म्हणून घ्यावें ही आश्चर्याची गोष्ट आहे. भाऊसाहेबांच्या बखरींत मराठ्यांस 'गनीम' अशी सज्ञा सर्वत्र दिली आहे. 'आपले लोक,' किंवा 'मराठे' अ[illegible] ह्मटलें नाहीं. या बखरींत 'बारगे' ह्या शब्दानें मराठ्यांचा व्यवहार केला आहे इंग्रजी 'नेटिव' शब्दाचो याचप्रमाणें स्थिते थोडथोडी होत चालली आहे.

१९. गुमान=बल्खा, हिशेब.

२०. हांवभरी=विशेष उत्सुक, उद्यु.

२१. पिच्छापुरविणें=पाठीमगें लागणें, धिरट्या घालणें.

२२. बेग[illegible] . बेचिराख=दीपहीन, अ[illegible]

२३ [illegible] प्राप्त झालेलें, खरोखर )

[illegible]

सोडून बाहेर निघाले. तीन टोळ्या केल्या. एक पूर्वेकडे गोठ पाठीशीं घालून मल्हारराव होळकर पन्नास हजार फौजेनिशीं पुढें तोफखाना देऊन उभे राहिले. उत्तरेकडे खांसा विश्वासराव व समशेर बहादर व जनकोजी शिंदे साठ हजार फौजेनिशीं उभे राहिले. व पश्चिमकडे खुद्द सदाशिवपंत व यशवंतराव पवार व आपाजी जाधवराव वगैरे साठ हजार फौजेनिशीं उभे राहिले. व इराणी दुराणी यांणीं आपला गोठ सोडून तयार होऊन आले. त्यांणींही आपले फौजेच्या तीन टोळ्या केल्या. अबदल्ली व सुजातदौले व हस्तनापूरवासी, मनसूरअल्ली वगैरे उभे राहिले. प्रातःकाळच्या पांच तास दिवसापासून सूर्य-अस्त पावेतों युद्ध जाहलें. सदाशिवपंतांकडील तोफखान्याच्या अग्नीचा मार जबरदस्त जाहला. तितकी आग पिऊन[24] गिलचे चालून आले. ते समयीं सदाशिवपंतांनीं मागें पुढें अणुमात्र न पाहतां इराणीच्या फौजेवर चालून घेतलें. तेथें हातघाई मोठी जाहली. नामी नामी सरदार सदाशिवपंतांकडील ठार जाहले. धारकरी शिपाई हजार बाराशें रणांत पडले. जखमी हजार बाराशें जाहले. व हजार बाराशें घोडे तळावर राहिले. हस्ती नग पंचवीस ठार पडले. अबदल्लीकडील पठाण चार हजार ठार जाहले. या विरहित उंट नफर[25] पांचशें व बाणाच्या कैच्यांचे व दारू गोळ्याचे व बातमीचे सांडणीस्वार मिळोन बहुत जाया जाहले. जखमी माणुस बहुत जाहले. सुजातदौले याजवर लढाईचा मोठा कहर वर्षला. मनसूरअल्लीकडे लढाईचा प्रसंग थोडा बहुत पडला. हातघाईमुळें मनसूरअल्लीकडील लोक साडेसातशें कामास आले. शिवाय सहस्त्रावधी[26] जखमी जाहले. हस्ती नग पंधरा व उंट नफर दीडशें येणेंप्रमाणें ठार पडले. अबदल्ली शिकस्त खाऊन फौजेसुद्धां मागें सरून आपले गोठांत गेले. सुजातदौले व मनसूरअल्ली आपआपले गोठांत गेले. मराठे यांणीं लढाईची शर्थ केली. आजपर्यंत तिमिरलंगा[27]पासून बहुत दिल्लीच्या सिंहासनावर बादशाहा जाहले. पुंड पाळेकरी[28] व रजपूत रांगडे व मेवाती, मारवाडी इत्यादिक जाहले, परंतु अशी लढाईची मर्दुमी कोणीही केली नसेल. मराठी फौज आह्मांस मोजेंतां दिसत नाहीं, याजकरितां मोठ्या तरतुदीनें आपल्या लष्कराभोंवते छबीनें[*] रात्रंदिवस मोठ्या मोठ्या सरदारांचे नेमून देऊन हुशारीनें राहिले.

या उपर इराणी व सदाशिवपंतांनीं दम खाऊन आपल्या गोठासमीप चवक्या

---

२४. पिऊन=

२५. नफर=नग, संख्या.

२६. 'सहस्त्रावधि' [illegible] प्र० ३ व ४ मध्यें "रजपूत [illegible] पठाण व कायस्थ व मारवाडी" असं[illegible]

२७. 'तिमिरलंग' ज्यास तैमूरलंग ह्मणतात.

२८. 'पुंडपाळेगार' प्र० १.

२९. 'मेचता' प्र० ३ व ४.

* छबीना=पहारा.

पहारे कडोविकैंडीचे[३०] ठेवून तयारींतच उभयतां होते. अशा अवकाशांत इराणी यांणीं आपल्या तर्फेनीं आणखी एक वेळ वकील पाठवावा असा सिद्धांत करून सुजातदौले व मनसूरअल्ली या उभयतांचें संमत घेऊन रहिमतखां व रसूल पठाण व मणिराम रजपूत व महींदाजी[३१] सुभानराव ऐसे चौघेजण पाठविले. कारण कीं, "तुम्हीं जोरावार होऊन अटकेची सरहद्द व मारवाड व लाहूर प्रांत व बंगालीं[३२] व अंतरवेद व काशी, प्रयाग व गया व काश्मीर पावेतों मुलूख काबीज करावयाची उमेद धरून बादशाई खजीना बंद केला. अटके पलीकडे ठाणीं घालावीं, चितोड व द्वारका व गुजराथ आदिकरून खालसा मुलुख केला. आग्रा प्रांतांतील खंडणी घेऊन अंमल करितां. या खेरीज दिल्ली म्हणजे बादशाई तख्ताची जागा, तेथील अमर्यादा करून फौज दरवर्षी पाठवून कैदकानू तुह्मीं आपली बसविली. याप्रमाणें काशीपलीकडे[३३] द्दमाऊ कमाऊचे पहाडापर्यंत अंमल सुरू करूं पहातां. बद्रिकाश्रम पावेतों जावयाची उमेद धरितां. रूमशाम येथें एकछत्री राज्य करावें, चतुःसमुद्र पावेतों पृथ्वी पादाक्रांत करावी, ही इच्छा रूमशामचे वडे बादशहा यांणीं नऊशें नऊ संदितें[३४] पेगंबर सुलतान महंमद यांणीं फर्जंदीस[३५] हुकूम केला कीं, दिल्लीपत बादशहानीं आम्हांस कुमकेस बोलाविलें. तुह्मीं अटकपार होऊन दक्षणेंत जाऊन दिल्लीपत बादशाहीचा मुलूख काबीज करून बंदोबस्तानें दिल्लीपतीची हुरमतें[३६] राखावी. या कारणास्तव आह्मी फौज घेऊन दिल्लीपतीच्या कुमकेस आलों. दिल्लीश्वर म्हणजे केवळ ईश्वरी अंश, संस्थान सर्व हिंदू मुसलमानांस वंद्य. असें असतां बादशाहींत फितूर नाहला. रजपूत रांगडे व अवंतर थोरथोर संस्थानकरिते जबरदस्त आहेत, ते तुह्मीं कसोसीतें[३७] आणून दिल्लीपत बादशाहीचा व सुरळीतपणाचा जैवा[३८] बसवून देऊन, तुह्मीं आपले स्वारीचा खर्च दिल्लीपतीपासून घेऊन आपले स्वदेशास जावें. व चितोडकर राणे संग्रामसिंग व उदेपूरकर व अमेरीकर[३९] व सवाई जयसिंग जैपूरकर[४०] या शिवाय बावन्न उमराव यांणीं बादशाहीच्या जहागिरी बंद

---

३०. कडोविकडीचे=नानाप्रकारचे, तजविजीचे.

३१. हा 'महादाजी सुभानराव' इकडे कसा !

३२. 'बागलाण' प्र० १ व २.

३३. या शब्दापुढें प्र० ३ व ४ मध्यें "तीन हजार कोसपर्यंत" असें आहे.

३४. संदित, सदित, सद्दींत !

३५. रूमशामचे वडे बादशहा कोण ! नऊशे नऊ काय ! पेगंबर सुलतान महंमद कोण ! फर्जंद=चिरंजीव किंवा पुत्रसम मानिलेला. किंवा गुलाम.

३६. हुर्मत=मान.

३७. कसोशी=जरब, धास्ती.

३८. जवा बसविणें=समेट करणें.

३९. येथेंही पूर्वीप्रमाणेंच 'अजमीरकर, अमीरकर' वगैरे पाठ आहेत.

४०. या शब्दापुढें "हिंदुपतकर" प्र० ४ व "टेहेरीकर" प्र० ३.

केल्या आणि तुझांशीं मिळून संपूर्ण हिंदूमय करूं पहातात. बादशाही सिंहासन अनादि होतें, तें ज्यांनीं बुडविलें त्यांचीं पारिपत्यें करावीं, व तुम्हांसही बेकैदी चालल्यास इजा द्यावी, सबब आमच्या खावंदांनीं आह्मांस रूमशामाहून बिदा[४१] करून पाठविलें. तुमचा पिच्छा पुरवावा लागेल. कारण कीं, तुह्मी अमर्यादा करून दक्षणेंतील बादशाहीचे खावंद निजाम उल्मुलूख व तुकुशा[४२] व विजापूर येथील इदलशा, तैसीच बेदैर[४३] व दौलताबादसारिख्या जागा, अमदानगर व कर्नाटक काबीज करून हैदराबादेस मोर्चे लाविले. सहासुभे दक्षणचे किलिजखां मुतालक व फत्तेजंग बहादूर व तोलेजंग बहादूर व शिध्धी अमीर वैगेरे बादशहाजादे दिवसेंदिवस खालीं आणले व बऱ्हाणपूरकर व औरंगाबाद व सोंदे बिदूर[४४] व त्रिचनापल्ली व श्रीरंगपट्टण व मछली बंदर व समुद्रतीर व गोमांतक व तमाम कोंकण व खंबायत अवंतर समुद्रांतील किल्ले महाकुबेल[४५] जागा एका परीस एक बांक्या[४६] सुरंज, भेलसे, गढेमंडळें[४७], खानदेश, नेमाड, व मनमाड व वऱ्हाड व खेचीवाडा व हडोती मुलूख काव्या-दाव्यानें[४८] सर करून, हांवभरी भरून दिल्लीस हिंदुपत बादशहा बसवून बेवीस उमराव पिढीजादे नांव बिनांव केलेले तुमच्या दहशतीनें कितीक मांडलिक जे आपल्या जागा सोडून फकीर होऊन देशांतरास गेले. सर्व बादशाही तुह्मीं मराठियानीं बेकैदी करून बुडविली. अलमगीर बादशहाचे वेळेचे नामी नामी उमराव शास्तेखां व असतखां व झुलपुकरखां नबाब नसरतैजंग[४९] व हिंमतखां व फत्तेसिंग व मनसूर अल्लीखां पठाण व खानखां व इभ्रामखां व हफ्तैहजारी[५०] व जामत अल्लीखां व फर्दुल्लाखां व फत्तेखां व हसनखां व रणमस्तखां व महमदखां व खावंदखां व कासमखां व किलिजखान, जैसिंग व संग्रामखां जोरावरसिंग व महिपतैसिंग[५१] असे थोरथोर यांचे बेटे व भाई व जांवई यांस गर्दीस मेळवूनें[५२] नेस्तनाबूद केलें. तसा हा मजकूर नव्हे. एवढी बादशाही, अनादि तक्त, याच तक्तावर युधिष्टिर बसत होते, तें तक्त तुम्हीं फोडून बादशहा परांगंदा करवून आणखी अटकपार होऊन

---

४१. बिदाकरणें=धाडणें, रवाना करणें.

४२. तुकुम शहा कोण ? ‘कुतुब’ तर नव्हे ?

४३. ‘हैदर’ प्र० १ व २. हें चुकीचें आहे.

४४. ‘बिदनूर’ तर नव्हे ?

४५. कुबल=मजबूद.

४६. बांक्या=बेलाग, दुःसाध्य.

४७. ‘गढेमंडळिक’ प्र० १ व २.

४८. काषादावा=कपट, युक्तिप्रयुक्ति.

४९. ‘नसरजंग’ प्र० १ व २.

५०. ‘हपतीत’ प्र० १ ‘हैपतीन’ प्र० २ ‘इतप्ते’ प्र० ३ प्रत करणारास मूळचा शब्द कळला नसला म्हणजे त्याचें कसें वेडेंवाकडें रूपांतर करितात त्याचें हें एक चागलें उदाहरण आहे. हफ्तहजारी=सप्तसहस्री, सात हजार स्वारांचा सरदार.

५१. ‘हिंमतसिंग’ प्र० ३ व ४.

५२. ‘मारून’ प्र० ३ व ४.

रूमशामची बादशायत घ्यावयाची मसलत करून, तेथीलही सरदेशमुखीची कैद कानू बसवून हक्क घेऊं पहातां. यांत कोणती किफायतें[५३] आपण पाहिलीत ? पेशजी बादशहा कृपावंत होऊन साडेसहा सुभे दक्षणेंतील सरदेशमुखी तुह्मांस करार करून दिल्ही, तो वंतें[५४] अनुभवून सुखरूप रहाणें. जाजती उपद्रव मुलुखास व बादशहास द्यावयाची गरज नाहीं. नर्मदा दक्षणतीरापासून पलीकडील हद्द तुह्मीं आपली संरक्षण करून असावें. आणखी तुमचे फौजेस घासदाण्याबद्दल दोन कोटि रुपये व एक कोटि रुपये स्वारीखर्च येणेंप्रमाणें रोख देऊन बादशाही सनद नवीन करून देतों. त्याबरहुकूम घेऊन बादशाहाची नौकरी करीत जाणें. हा करार असल्यास सलुख संपादिला जाईल. ही गोष्ट तुमचे खातरीस न येई तरि लढाई करावी लागेल. याचा पक्केपणें विचार करून सांगितल्या गोष्टी मान्य असल्यास लिहून पाठवाव्या. त्यासारिखे आम्ही बादशाहाची खातरजमा करून येतों. सेवकपणाचे धर्मानें बादशहाचे पायांजवळ वर्तणूक करून, बादशहाचे खिजमतीस एक साल राहून, सरफराई[५५] करून घेणें. जिदें[५६] वाढविल्यास कामास येणार नाहीं. त्यांत तुम्ही माकूल[५७] आहां.

याप्रमाणें सर्व मजकूर इराणीच्या वकिलांनीं सदाशिवपंतांस समजाविला. तो मजकूर सदाशिवपंतांनीं श्रवण करून मातबर सरदार व मल्हारजी होळकर यांचे विचारें ठरवून सांगितलें कीं, "हिंदूपत बादशाही[५८] येथील बंदोबस्त करणें तो आह्मीच करूं. तुम्ही पर पातशहाचे असतां आपली हद्द सरदें[५९] टाकून मनसूर अली व सुजातदौले यांचे विचारें हांवभरी[६०] होऊन आलीकडे आलां. मागें तुह्मींच येऊन अगदीं बादशाही बुडविली. हल्लीं मिर्रा[६१] बुबु बेगम यांचे अनुमतें येऊन व्यर्थ दंगा आरंभिला. ही गोष्ट इनसान[६२] नव्हे. मागें आलां[६३] ते समयीं आम्ही असतों तर बादशाहीची खराबी होऊं न देतों. आतां तुम्ही आमचे मसलतीस अडथळा करणार कोण ! आमचे चित्तास येईल त्याप्रमाणेंच करावयास श्रीमंत नानासाहेब समर्थ आहेत. रूमशामची खबर आम्ही घेणार, तेथें तुमचा मजकूर कोठें ? तुम्हीं आपल्या मार्गें अटक उतरून जावें. भाई-

---

५३. किफायत=विशेष फायदा.

५४. वंत=वांटा, हिस्सा.

५५. सरफराई=सरफराजी !=शिफारस, गौरव.

५६. जिद=जिद्द=उपरोध, विरुद्धता.

५७. माकूल=मान देण्यास योग्य, उचित. 'माकूलमुचितमवेत्' राजव्यवहार कोश.

५८. 'बादशाहा' प्र॰ १ व २.

५९. सरद—सरहद्द=सीमा.

६०. हांवभरी=उत्कट इच्छा धरिली ज्याणें असा.

६१. 'मिमीरा' पाठभेद.

६२. इनसान=न्यायाची ? योग्य !

६३. नादिरशहाच्या स्वारीस उद्देशून हें म्हणणें आहे.

चारा राहावयाचा असल्यास लौकर फौजेसुद्धां माघारें जावें. जे जें तुम्हांस आमचे पारिपत्यास्तव घेऊन आले असतील त्यांनीं तरी कोणती किफायत पाहिली ? आम्ही तुम्हांस एकंदर[64] दबून राहणार नाहीं. आम्ही सर्व गोष्टींनीं तरतूंददार[65] आहोंत. हिंदुपत बादशाहीचे वगैरे माणूस मातबर उमदे दौलतकर्ते पंतप्रधान बहादूर आहेत. त्यांजवर सर्व राज्याचा भार आहे. चार लक्ष फौजेचे बादशहा श्रीमंत छत्रपती महाराज सातारकर, त्यांचा जय प्रताप विक्रम पराक्रम वरद हस्त आमचे मस्तकीं आहे. सर्व धरित्रीचें राज्य स्वामिकृपेनें संपादितों. आजपर्यंत संपादीतच आलों. तुमचे हुकुमाची तमा[66] धरीत नाहीं. लढाई करावी हाच आमचा निश्चय आहे." असें साफ सांगितलें. व सदाशिवपंतांनीं आपले तर्फेनें लक्ष्मण बल्लाळ व बुरूणशा या उभयतांस इराणीकडे वकिलीस पाठविलें. त्यांस तेथें बोलण्याची आज्ञा झाली जे, तुम्हीं फौजेसुद्धां माघारें जावें. उद्यां येथें रहावयास दरकार[67] नाहीं. आज्ञेप्रमाणें वकिलांनीं मजकूर निवेदन करितांच अबदल्लीस परम विषाद आला. आणि तेच क्षणीं भाऊसाहेबांकडील वकिलांस[68] अवकाश न घेतां माघारें रवाना केलें. आणि सांगोन पाठविलें कीं, उदईक लढाईस तयार होणें. आम्ही चालून येतों.

याप्रमाणें वकिलांचीं कठोरपणाचीं भाषणें सदाशिवपंतांनीं समजून घेऊन, मजालस[69] करून, तमाम लहान थोर सरदार बोलावून आणून सरफराई केली. मोत्यांच्या कंठ्या व शिरपेंच व जडावाचीं कडीं व कलग्या व तुरे, चौकडे व मंदिल व शालजोड्या व बादली[71] चिरें व घोडे व हत्ती व पालख्या व वस्त्रें व अबदागीर व फत्ते जाहल्यावर मानपानाच्या ताजिमा[72] व कोणास गांव व परगणा व कोणास सचंतर[73] एक देशीचें राज्य, अवांतर सरदार लोकांचीं मनोधरणेचीं बोलणीं बोलून, सदहूप्रमाणें बक्षिसें देऊन, एक दील होऊन, सर्वांस स्तुतीनें गौरवून नांवाजिलें.[74] तेव्हां थोर थोर सरदारांनीं उत्तर केलें कीं, " भाऊसाहेब महाराज ! आम्ही तरि जीविताची तमा धरीत नाहीं. इराणीची कथा किती !

---

६४. एकंदर=बिलकुल, अगदीं.

६५. ' उपायस्तर्तुंदः स्मृतः ' रा० व्य० को०.

६६. तमा=भीति, धास्ती.

६७. दरकार=जरूर, गरज, अधिकार.

६८. हा शब्द प्र० १ व २ मध्यें नाहीं.

६९. ' मजालसी सभा ज्ञेया ' रा० व्य० को०.

७०. मागें पृ० २१ टीप ५५ पहा.

७१. बादली चिरें=जरतारी वस्त्रें.

७२. ' अभ्युत्थानं तु ताजिमम् ' रा० व्य० को०.

७३. ' स्वतंत्र ' शा० मे०.

७४. भाऊंचें हें सर्व वर्तन ध्यानांत ठेविण्याजोगें आहे. भाऊंच्या स्वभावावर जे कांहीं आरोप आणिलेले आहेत त्यांचें अंशतः निराकरण करण्यास हा लेख उपयोगी पडेल.

मारून गर्दीस मिळवून देऊं." हाच निश्चय सर्वांचा होऊन आपआपल्या शिबिरास गेले.

पहांटेची दोन तास रात्र उरली तेव्हां सरकारी साहेबनौबैत[75] लढाई-प्रसंगाची करून नकीबांसे[76] ताकीद करावयास सांगितली. नकीबांनीं सर्व लष्करांत फिरून ताकीद केली. प्रातःकाल होतांच तमाम फौजेसुद्धां सरदार शिलेपोसें[77] तयार होऊन आले. एकापरीस एक, भीमार्जुनासारिखे महावीर, दर रिकीबीसें[78] तरवार गाजविणारे, अंगीं वीरश्रीचीं वारीं, रणांगणाचा शृंगार करून, घुगिया[80] व बख्तरें[81] व टोपे[82], चिलखतें, बिन्यां[83] व बिरजें[84] व वस्त्रें तकटी[85] व मुक्तमाला व मस्तकीं तुरे व कलग्या व अंगीचे बारा अलंकार व जरीचे अबदागिरे करून शोभायमान, हातीं पट्टे व गुरगुंज* व फिरंगीणा[86] व बिचवे व कटारा व पेशकब्जे व वाघनखें व भाले व कोयते व परीघ व पट्टीश व फरश व गारभांडीं[87] व सांगा व बरच्या व बंदुका कटीतटीस शस्त्रसंभार बांधून आपआपलाले वाहनारूढ होऊन, अंगीं स्फुरणें अतिशय, युद्धास जावयास अति उदित, स्वामिसेवेशीं तत्पर, अशा आवेशाचे पुरुष हाजारों हजार सिद्ध झाले. अनसूंट[88], नव्या उमेदीचे, शिपाईगीरीची शर्थ व्हावी म्हणून उमेदवारीनें बिरदें बांधून, शिरीं समले[89] सोडून, घोड्यास जडावाचे अलंकार करून, एकाहून एक आगळे, जीवित्वास तृणप्राय मानणारे असे शहाण्णव कुळींचे मराठे घोड्यास नटनागर, जरीबादली पाखरा[90] व शिऱ्या व सडकीं व पायीं तोडेरें[91] बांधून घोड्यांस थापटून उभे राहिले.

---

७५. साहेबनौबत=मोठा युद्धदुंदुभी.

७६. नकीब=चोपदार, भालदार.

७७. शिलेपोस=कवच वगैरे लढाईचा बंदोबस्त करून तयार.

७८. दररिकीबीस=पुनः पुनः,क्षणोक्षणीं.

७९. 'लावणारे' प्र० १, २ व ३.

८०. घुगी=अंगत्राण. हें घुगुसाचें अ- सून शिरासुद्धां सर्व अंगाचें संरक्षण करतें. परंतु राजव्य० कोशांत 'घुगीनाम शिर- स्त्राणं' असें म्हटलें आहे. पहिला अर्थ मोल्स्वर्थसाहेब देतात.

८१. बक्तर=जाळीदार पोलादी चिल- खत. परंतु रा० व्य० को० "वक्तरं चर्म कीर्तितम्" असें आहे. पहिला अर्थ मोल्स्वर्थसाहेबांचा.

८२. टोप=शिरस्त्राण "टोपः शीर्षण्य नामकः" रा० व्य० को०.

८३. बिनी=नासात्राण.

८४. बिरजे–! बिरुदें तर नव्हेत ? सर्व प्रतींचा पाठ एक सारखाच आहे.

८५. तकटी=जरीची !

* गुर्गुज, गुर्गुजा=गदा.

८६. फिरंगाणा, फिरंग=फिरंगी तलवार. ही टोलिडो येथील असावी.

८७. 'व गारभांडीं' हे शब्द प्र० १ व २ मध्यें नाहींत. गारभांडें=गारेचा चाप आहे ज्या नळीस असें नलिकायंत्र, बं- दुक वगैरे.

८८. अनसूट=अनुच्छिष्ट=ताजे, नवे.

८९. समले=पागोट्याचीं लांब टोकें.

९०. नटनागर ? जरी बादली पाखर= सुवर्णतंतुमय वस्त्राचें अश्वकवच. शिऱ्या ! 'शिरपा' असेंही होईल. सडका=अ- श्वचामर.

९१. 'तोरड' 'तोरड्या' पाठभेद.

तसेच हवदे व अंबाऱ्या व नवरत्नांच्या मुक्ताभरणी झालरा याप्रममाणें गजभार सिद्ध जाहले. जंबुरे व न्हेकले व जेजाला व सुतारनाले व थोरलीं[12] भांडीं येकूण आवाज दीड हजार, याप्रमाणें आराबीं[13] पसरून व बाणांच्यीं[14] कैंच्या उंटांवर लादून, बाण लावणारे सहवर्तमान एकदांच सकल समुदायानिशीं सिंहनादें गर्जना करून रणास जावयास निघाले.

नंतर सैन्याचे चार भाग करून दक्षिणेचे[15] बाजूस खांसे विश्वासराव साहेब वीसें[16] हजार एकांड्यांनिशीं, त्यांचे डावे बाजूस मल्हारराव होळकर पन्नास हजार फौजेनिशीं, व पूर्वेस भाऊसाहेब साठ हजार फौजेनिशीं, व पश्चिम दिशेस जनकोजी शिंदे पन्नास हजार फौजेनिशीं, व उत्तरचे बाजूस तोफखाना सैंठ[17] हजार पायदळासहित इभ्राईमखान गारदी याजकडील लोकांनीं मस्तकावर ढाला घेऊन, नम्र हत्यारें करून, सावधतेनें, जुम्मेंस[18] न खातां, मांडीस मांडी देऊन, ऐंक घोडा राऊत न मिसैंळे अशा बेतीनें निशाणांचे फरारे सोडून उभे राहिले.

इराणी दुराणी व हस्तनापुरवासी व दिल्लीपत बादशहा यांनीं फौजेच्या चार टोळ्या केल्या. एक्या टोळीस खांसे अबदल्ली पन्नास हजार फौजेनिशीं व दुसरे टोळींत सुजातदवले पन्नास हजार फौजेनिशीं व तिसरे ठोळींत मनसूरअल्ली[100] तीस हजार फौजेनिशीं, मध्यभागीं मुख्य इराणी पाऊणलक्ष फौजेनिशीं, याप्रमाणें आपआपले सरदारांस व पायदळांचे जमातदारांस निक्षूण ताकिदी रणप्रसंगाच्या होऊन बेलाशक चालून घेतलें. तोफखान्यावर जाऊन पडले. एक रंजकेची सरबत्ती होतांच दोहोंदळांत धुंधःकार होऊन एकमेकांस दिसेनासें जहालें. धुरानें दिवाकर अगदींच आच्छादित जहाला. आपपर कोणीं ओळखेनासें जहालें. दोन प्रहरपर्यंत एकसारिखा तोफखाना उभयतांकडील सुरू होता. धूर निवारण होतांच पाहूं लागले तों अमित्राकडील[2] पठाण वीस हजार कामांस[3] आले. व सदाशिवपंत भाऊंकडील लोक पायदळ व धोडेस्वार अजमासें वीस पंचवीस हजार कामास आले. श्रीमंत विश्वासराव साहेब व सदाशिवपंत भाऊ व

१२. मांडें=नलिकायंत्र. 'मांडें नाम महायंत्रं' रा० व्य० को०–थोरलीं मांडीं=मोठ्या तोफा.

१३. आराबा=यंत्रव्यूह, तोफखाना.

१४. "बाण सुमारें तीस हजार" प्र० ३.

१५. 'उजवेकडे' प्र० ३ व ४.

१६. 'सत्तर' प्र० ४.

१७. 'ऐशी' प्र० ३ व ४.

१८. जुंमस, जुमान; जूम=भय, धास्ती, दरारा.

१९–१९. या बद्दल प्र० ३ मध्यें "एक राऊत व एक माणूस न फुटतां" असें आहे.

* शत्रूचा स्वार आपणांत येऊं न पावे.

१००. ह्मणजे "नजीबखान रोहिला" असें समजावयाचें.

१. 'साठ हजार' प्र० ३.

२. अमित्र=शत्रु.

३. कामास येणें=लढाईंत पडणें, ठार होणें.

देऊन सात आठ मजलेचे अंतऱ्यांनीं कूच मुक्काम करून चालले होते, व रुक्न दौलांनीं तहवरजंगास इषारा करून दंडवतीवर फौज महिपतराव समागमें त्रिंबकराव याजबरोबर रघोजीभोंसले सेनासाहेब दर्याबाईसाहेब होतीं यांजकडे जावयास राहिली होती ती तहवरजंगांनीं फौजे समेत जाऊन छापा घालून लुटलीं. यावर महिपतराव दिनकर सेनाधुरंधरास, पोंहचवून माघारे आले, तों हें वर्तमान मार्गांत समजलें, तसाच जमाव राहिला. तो समेटून दर्याबाईकडे आले. महिपतराव यांचे फौजेंत खर्चाची अडचण होती सबब आपले चिरंजीवांचे आंगावरील कंठी तोडे गोप वगैरे मोडून लोकांस फौजेचे खर्चास दिलें. हें वर्तमान दर्याबाईसाहेबांस समजल्यावरून, दिनाजीपंत सुभेदार यांज समागमें दहा हजार रुपये खर्चास पाठवून दिले. वस्ता मोडल्या हें दिनाजी पंतांनीं पाहून, दर्याबाई साहेबांस हे वर्तमान सांगितलें. याजवरून मुलास पहावयास बोलावून नेऊन वस्त्रें व दागिनें कडीं, गोफ सोन्याचे दिले; आणि कूच करून मजल दरमजल त्रिंबकराव मामाकडे चालले. तशांत रास्ते, दादासाहेबांचे फौजेंतून आपले पतकांसुद्धां पळून निघाले तेव्हां फितूरसा दिसला. हें महिपतराव यांनीं ऐकून अंदेशा केला कीं, अवघ फंद जाहला. परंतु दादासाहेबांची कृपा सेनाधुरंधरावर पूर्ण आणि नबाबास वांचविल्याचें कारण सेनाधुरंधर असें असून, आमची फौज लुटली व फंदांत मिळाले. दुर्दशा करून आपले पुत्र बळवंतराव महिपत व राजोबा, व त्रिंबकराव मोरेश्वर फार हैराण होते, याजकरितां मनाजीपंत फडनीस बरोबर देऊन चंद्रपुरास रवाना केले. आपले समागमें निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे, बापूजी धर्माजी व गोविंदराव मामा अशी मंडळी घेऊन फौजे सहित रघोजी बोवा सेनासाहेब सुभा सहित त्रिंबकराव मामांचे भेटीस दर्याबाईसाहेब गेल्या. भेटी होऊन माघाऱ्या आपल्या लष्करांत आल्या. तैशियांत साबाजी भोंसले व त्रिंबकराव मामा एकत्र होऊन कूच करून गंगातीरास आले. तेव्हां फितूर उघडच दिसला. ते संधींत दादासाहेबांस हे वर्तमान समजल्यावरून त्यांनीं मसलत करून साबाजी भोंसले यांजला पत्र लिहिलें. कारण कीं, " उत्तर आल्यास बरें आहे, न आल्यास फंद खचित समजावा." याजवरून लिहिलें कीं, " बत्तीस लक्षांचा मुलूख, आशिरचा किल्ला, तुमचे जातीस रहावयास, नूतन पद देण्यांत येईल. इकडे लक्ष ठेवून चाल धारणा ठेवणें." याचें उत्तर आलें नाहीं, व नबाब बंदेगान अल्ली मार्गाहून दादासाहेबांकडे न जातां माघारे फिरले.

८. अधिकारांतलें सैन्य.

९. लेखांक ( ४ ) पहा. दादांनीं या समयीं हाच करार साबाजीशीं केला.

तेव्हां फंद जाहीर झाला. सबब दादासाहेब कर्नाटकचा रोख टाकून माघारे फिरून आले. त्या संधींत दर्याबाई साहेब व रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा महिपतराव दिनकर फौजेनिशीं बरोबर असे त्रिंबकराव मामा यांनीं मेजवानी रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांस केली. वस्त्रें शिरपेच कंठी मोत्यांची वगैरे दिली. जशी दादासाहेबांनीं दिवाणगिरीचीं वस्त्रें बहुमान दिलीं होतीं तशींच महिपतराव दिनकर यांजलाही दिलीं. व रामजी केशव व दिनाजीपंत सुभेदार व मल्हारपंत पाटणकराचे दिवाण कारभारी केले होते, व गोंदाजी भाऊ लडी आदीकरून सर्वत्रांस वस्त्रें साडेतीन सनगाप्रमाणें दिलीं. बहुतां प्रकारें समाधान करून दाखविलें. परंतु महिपतराव सुभेदारांस चैन नाहीं. दादासाहेबांचे पक्षांतील तेव्हां कसें घडेल ? हें साबाजी व नबाब एक झाले. आपण येथें रहावें परंतु दर्याबाई, त्रिंबकराव यांस मिळाली असतां समजलें नाहीं, कारण दर्याबाईसाहेबांशीं व साबाजी भोंसले यांशी द्वेष भारी; याजकरितां त्रिंबकराव यांत दर्याबाई नाहीं; दर्याबाईचा लोभ महिपतराव यांजवर भारी दिसूं लागला; व रघोजी भोंसले व बाळाबाई ही आपलेच आहेत असें असतां, दर्याबाईंनीं एक दिवस महिपतराव यांजला बोलावून बहुत प्रेम करून बोलले जे, " तुजला एक विचार पुसतें. हे सारे त्रिंबकराव-नबाब-साबाजीबोवा एक झाले. दादासाहेब मुधोजी बोवा येथें नाहींत. आपण यांतच मिळावें. बचाव होईल; पुढेंही बरें आहे. आम्ही मुधोजीबोवांचे डोचकें कापूं तर यांत तुम्ही अनकूलच असावें." या प्रकारें अघटित भाषणें नाना प्रकारें बोलले. सुभेदारांनीं ऐकून उगेच राहिले. तेव्हां आणिक दर्याबाई साहेब बोलले जे, याचें उत्तर कांहींच दिलें नाहीं." सुभेदारांनीं रागानें उत्तर केलें कीं, "आम्ही असें बोलणें ऐकून जीवित ठेवूं नये. लहानाचे मोठे त्यांचें अन्न खाऊन झालों, तेव्हां आपण असें बोलणें आणि आम्हीं ऐकणें हें उभय पक्षीं उचित नाहीं." असें बोलून उठले. तंव बाई साहेब बोलल्या कीं, "तुजला राग आला, तुझें चित्त पाहिलें कीं, आपासाहेबांकडे तुझें लक्ष कसें आहे." हें बोलून खात्री बहुतशी केली. याजवर हे घरास आले. सचिंत झाले. नंतर दुसरें दिवशीं दर्याबाईंनीं बोलाविलें आणि ह्मणाले कीं, त्रिंबकराव याजकडे जाऊन कांहीं बोलावयाचें आहे तें बोलून आपली तयारी केली, आणि त्यास बोलले कीं, आम्ही पुढें जातों, तुम्ही जेऊन लौकर यावें, आपले कारभारी दिनाजीपंत व गोंदाजी भाऊ लडी व रामाजी केशवही त्यांचे मिळणींत; पानशांचे सोयरे, हे सारे एक, तेव्हां बाईसाहेब दिनाजी पंतास घेऊन पुढें गेले. आणि त्रिंबकराव यास बोलले कीं, महिपतराव सर्व प्रकारें दादासाहेब व

मुधोजीबोवा यांचा पक्ष; सखाराम हरी, ते दादासाहेबांचे दिवाण, लक्ष्मणराव काशी व त्र्यंबकराव काशी हे त्यांचें सर्व मंडळ एक हे पंचवीस हजार फौज आमची त्यांचे स्वाधीन आहे, आमचें कांहीं चालत नाहीं असें नाना प्रकारें बोलले. तेव्हां यांस कैद करावें, कळूं देऊं नये, आतां येईल, प्रेम दाखवून जें करणें तें करावें, आम्ही त्यास बोललों, तों आह्मास त्यानें उत्तर अमर्याद केलें याजकरितां त्याचें पारिपत्य करावें" हें त्रिंबकराव यांनीं ऐकून उत्तम म्हणून बोलले. इतक्यांत मागाहून माहिपतराव सुभेदारही गेले. त्रिंबकरावांनीं ताजीम देऊन मान सन्मान करून फौजेचे खर्चाचें वगैरे बोलणीं करून बिदा केलें. एकांतीं बोलले जे, "आपण उदईक एकटेंच यावें सध्या बाई आहेत." याजवर हे घरास आले. याजला दुसऱ्या वेळीं म्हणजे संध्याकाळीं बोलावून आणिलें. सुभेदार गेले. त्रिंबकराव गोदावरीचे कांठीं मुक्काम होता, तेथें सायंकाळची संध्या करीत होते तों हे गेले. त्यांस बहुत प्रेम-युक्त भाषण केलें कीं, "तुम्ही खातरजमेनीं असावें, तुमचे ठायीं आस्था फार आहे, सखाराम हरी तुमचे बंधु, तेव्हां सखाराम हरीवर आमचा लोभ विशेष कर्नाटकांत त्यांनीं काम काज केलें, त्याचे सरभाईत थोरले रावसाहेबां-जवळ इतराजींत असतां त्याजवर रावसाहेब यांची कृपा झाली. कामाकाजांत वागणुकींत तेथें कायते जाणून त्यांनीं हें साबाजी बोवांचे पारपत्याचें कार्य सांगितलें. येथें प्रसंग विलग झाला. नबाब व साबाजी भोंसले एक, व कांहीं मंडळी सखारामपंताचे आप्त पुण्याहून त्यांजकडे आले, तेव्हां चार दिवस त्यांज सारखेच असावें, तुम्ही खातरजमेचीं जबामर्द माणसें, जवामर्द तुमची फौज, ती माझी आहे. चिंता नाहीं. उदईक तुम्हांस पन्नास हजार रुपये सध्या देतों, आणि ही गंगासाक्ष आहे," गंगेवर हात ठेविला. मायावादी गोष्टी केल्या. सुभेदार त्यांचे विश्वासावर; दुसरे दिवशीं पन्नास हजार रुपये खर्चास पाठविले; आणिकही दोन चार दिवसांनीं देतों, चिंता नाहीं. तो दिवस गुजरला. तिसरे दिवशीं प्रातःकाळींच बोलावूं पाठविलें, हे स्नान संध्या करून तिसरे दिवशीं पालखींत बसून एक कोतवाल घोडी, पांच खिजमतगार, दहा जासूदजोडया, बरोबर घेऊन गेले. डेऱ्यांत बसविले. येतों म्हणून सांगून पाठविलें कीं, आपणाशीं कांहीं बोलावयाचें आहे; बोलावूं येऊन दुसरेकडे पालखी आणून त्यांत माहिपतराव सुभेदार यांस घालून हजार लोक बरोबर व दोन खिजमतगार यांचे समागमें मात्र दिले; वरकड मनुष्यें

तेथेंच कैद केलीं. चंदनवंदनचे सुमारें पाठविले. चंदनचे[१०] किल्यावर त्यांजला कैद केलें; आपण त्रिंबकराव दरकूच पंढरपुरास गेले. इकडे दर्याबाई-साहेबांस आनंद झाला. दिनाजीपंत सुभेदार, व गोंदा भाऊ लडी, रामाजी केशव, मल्हारपंत हे कारभारी. त्यांत मुख्य दिनाजीपंत असे चालले. महिपतराव सुभेदाराचे चुलते उमाजी विनायक व निंबाजी शिवदेव हजार दीड हजार लोकांनिशीं मल्हारराव पागे असे होते. तंव त्रिंबकराव पंढरपुरास गेले. समागमें दर्याबाई रघोजी बोवा साबाजी बोवा व नबाब निजाम अल्लीखान रुक्नदौला सारे इकडून गेले व तिकडून दादासाहेब भवानराव[११] प्रतिनिधि, मुघोजीबोवा, सखाराम हरी, महमदइसफ या जमेतीनें येऊन, त्रिंबकराव यांची लढाई कांसेगांवावर झाली. सारी फौज टिकून, त्रिंबकराव एकलेच आपलें फौजेनिशीं साह्य तेथें आले. जखमा आंगावर, त्रिंबकराव यांस लागल्या. धरले गेले. दादासाहेबां जवळ पाडाव करून आणिले, आणखी आणंदी बाईसाहेबांनीं बटकी हातीं शेणाचे दिव्यांनीं ओंवाळिलें, यश घेऊन साबाजी भोंसल्याचे आले यशस्वी झाले. फौज फितूर सारी. दुसरे दिवशीं भवानराव प्रतिनिधीस, रुक्नदौला यांणीं निरोप पाठविला कीं, " दादासाहेबां-जवळ तुम्ही मुक्काम करून राहणें ठीक नाहीं, कूच करून इकडेस यावें, त्रिंबकराव पाडाव होऊन गेले तेव्हां त्या फौजेंत कोणीं सरदार नाहीं, आम्ही तुमचे आहोंत, साबाजी भोंसले व दर्याबाई हीं आपलींच आहेत. महिपतराव यांजला कैद केलें, या योगांनीं मुधोजी भोंसले यांशीं व दर्याबाईसाहेबाशीं विरुद्धच आलें आहे, त्यास आपण यावें." यावरून भवानराव प्रतिनिधी दादासाहेबांजवळून कूच करून रुक्नदौलाकडेस आले. दादासाहेब हवालदील [ झाले ] त्रिंबकराव यांणीं दादासाहेबांस याद[१२] दाखविली कीं, सारे फंदांत [ आहेत ] यांचीं नांवें एक मुधोजी भोंसले व सखाराम हरी आणि महमदईसफ हे मात्र नाहींत, वरकड सारे अंबारीचे माहुता सुद्धां त्याच मिळणींत आहेत; हें पाहून दादासाहेब फारच उदास झाले. त्रिंबकरावे[१३] मेले. त्यांजला दहन करून तसेच कूच करून बऱ्हाणपूरचे मार्गें दादासाहेब निघाले. ते वेळेस सेनाधु-रंधर यांणीं व्यंकटराव कासी यांस, आंतून फौज फुटफाट झाली; ते वेळेस सखाराम पंत पुरंधरे याजकडे मुधोजी बोवानीं पाठविलें, ते प्रसंगीं दादा-

---

१०. महिपतरावास कैदेंत ठेवण्याचें काम दर्याबाईच्या मसलतीवरून त्रिंबकराव मामांनीं केलें.

११. (आ) बखरींत दादा साहेबांनीं भवानराव प्रतिनिधीच्या सांगण्यावरून त्रिंबकरावाशीं लढाई केली असें आहे.

१२. (आ) बखरींत "बारीदारासुद्धां फितुराची याद दाखविली" असें आहे.

१३. फसली ११८३ सालीं चैत्रमासीं मामांचा काळ झाला.

साहेबांस विनंति केली जे, " मुलें माणसें, कोंथळ्यांत आहेत त्यांस काहाडावयास जातों." त्यांणीं आज्ञा दिली. ते समयीं सखाराम-पंताकडे पुरंधरास जाऊन बोलले कीं, " मुधोजीबोवा भोंसले यांचें लक्ष आपलेकडे आहे. महिपतराव सुभेदार यांचे कारभारी यांचेंही लक्ष आपणाकडे पहिले पासून, त्यास उगेंच, त्रिंबकराव मामांनीं तेथील दर्याबाई जवळ कारभारी यांचें म्हणण्यावर हे कैद केले. त्यास आपले जवळ आणवावें, म्हणजे सेनाधुरंधर आपलेच जाणावे. याचे स्वाधीन आहेत, हें स्वामींचे लक्षांतच आहे." हें ऐकून सखारामपंतानीं चंदनचे किल्ल्यापासून महिपतराव यास आपले जवळ आणविलें. बोलणीं[14] प्रेमाचीं झालीं. बहुमान वस्त्रें वगैरे दिलीं. यांणीं विनंति केली कीं, " जेजोरीचें देवदर्शन घेतों. मुधो-जीबोवा दादा साहेबापासून निघाले जाणावे; पहिले चंद्रपुराहून आपलेच भरं-शावर निघणें झालें. त्याची पक्कायत झाली." जेजोरीस जाण्याचा निरोप दिला. सिरपेंच, कंठी वगैरे दिलीं. देवदर्शन घेऊन लवकरच येऊन मुधो-जीबोवांस श्रीमंतापासून काढावें, हें करणें तुह्माकडेस आहे. सर्व कबूल केलें. बाबाजीबोवा चिटणीस होते. तेथें जामीन देऊन पुरंदरचे किल्ल्याखालीं आले. तेथून जेजोरीस महिपतराव आले. मनसुबा केला जे, आपले स्थळास जावें. तेथील पाटील कदम म्हणोन होता. त्याजपाशीं घोडीं विकत घेऊन आपण व महिपतराव कासी मिळून निघाले. ते तुळजापूरचे मार्गानें निघाले. इतक्यांत इकडेस भवानराव प्रतिनिधीस त्रिंबकराव याचे फौजेतील मालकी द्यावी, हा बेत साबाजी भोंसले आदि करून यांणीं ठरविला. वस्त्रें द्यावीं इतक्यांत समारंभाचे वेळेस, साबाजी बोवांचे फौजेंत हत्ती[16] मेंही सुटला. गल-बलींत भवानराव यांचें पागोटें पडलें, ह्मणून ते दिवशीं मसलत राहून दुसरे दिवशीं आणिक समारंभ केला. तों भवानी शिवराम बोलले जे, " याजविशीं अपशकून झाला, हें ठीक नाहीं. आपणास महत्कार्य करणें आहे, त्यास हरि-पंत फडके येथें फौजेंत आहेत, व पुण्यास सखारामपंत व नाना फडणवीस आहेत. तेव्हां त्यांचें लक्ष हरीपंताकडे आहे, त्याजला उभें करावें. मातबर माणसें राव[17]साहेबांचे कृपेंतील." आक्षेप बहुतच भवानी शिवरामाचा. त्या प्रसंगीं साबाजी बोवा बोलले कीं, " आम्हास खर्चास पैका कोण देतो, नबा-बाची फौज मदतीस आली आहे, त्याजला मदत खर्च दिल्या शिवाय कसें

---

१४. महिपतराव, नाना आणि बापू यांची भेट पुरंधरास होऊन प्रेमाचीं भाषणें झालीं.

१५. महिपतरावानें.

१६. हें हत्तीचें नांव.

१७. माधवराव बल्लाळ पंत प्रधान.

होईल ? " तेव्हां हरीपंत बोलले कीं, " त्रिंबकरावमामा मेले तरी काय चिंता आहे ? श्रीमंतांचे पदरीं त्या सारखे फौजा बागविणार बहुतेक आहेत. " त्याजवरून धैर्य होऊन सखारामपंताचे व नाना फडणविसांचे संधानावरून हरीपंत यांजला फौजेची मालकी देऊन, साबाजी बोवानीं रुक्नदौलास लिहून पाठविलें कीं, " आज कूच करून सामलातीस बोलावून दादासाहेबांवर चालले. " मग हरीपंतानीं पत्र सखारामपंतास पाठविलें कीं, " महिपतराव दिनकर सुभेदार याजला आपले जवळ आणून सोडावयाचा विचार करून आपले जवळ आणिले, हें ठीक नाहीं. पुन्हां त्यांस जेथें होते तेथें ठेवावे. त्यांस सोडल्यास मुधोजी भोंसल्यांची नड कायमच आहे. महिपतराव कैदेंत आहे याजकरितां सेनाधुरंधर दम खाऊन आहेत. " असाच आक्षेप साबाजीबोवांचा व दर्याबाईचा व पंत मजकुरांचा. भाऊपणा याचें कारण पंत मजकुराचा व मुजुमदाराचे सोयरे, या योगानें फडके दर्याबाईचे बंधु, यांचे मार्फतीनें पेशवी साबाजी बोवास सेनासाहेब सुभा याचीं वस्त्रें आणिलीं होतीं. तेव्हां दर्याबाई हरीपंताचे येथें जाऊन बोलल्या कीं, " महिपतराव याजकडेही लिहिलें. अनर्थ झाला. " तसेंच रुक्नदौलाचें म्हणणें पडलें कीं, " सोडूं नये. " अशीं पत्रें तिघांचीं आलीं. हरीपंताचें पत्रांसहित पुरंदरास पोंहचलीं. तीं वाचून पाहिलीं. त्याचे पूर्वी महिपतराव यांस जेजोरीस जाण्याची आज्ञा झाली होती. ते तुळजापूरचे मार्गानें निघाले व त्र्यंकटराव कासी याणीं आपलीं मुलेंलेंकरें कोथळ्याहून काढिलीं आणि आपण पुरंदरास गेले. सखारामपंत व नाना फडणवीस यांणीं हें पत्र येतांच दोन हजार फौज तयार करून महिपतराव सुभेदार यांस धरून आणावयाकरितां पाठविली. लाग लावीत त्यांचे मागें गेले. तंव महिपतराव दिनकर व महिपतराव कासी एके गांवीं दुकानांत मुक्कामास उतरले होते. स्वार हजार बाराशें पाहिले. स्वारांनीं महिपतराव कासीस विचारलें कीं, " इकडून भोंसल्याचा दिवाण गेला कीं काय ? " त्याणें उत्तर केलें कीं, " आम्हास वाकब नाहीं, परंतु दोनशें स्वार आंताच इकडून गेले, अशांत जाल तर सांपडतील. " याजवरून ते स्वार तसेच निघाले. नंतर यांणीं कूच करून तुळजापूरचे मार्गानीं बालेघाट, परळी, आष्टी, देऊळघाट प्रगण्याचीं गांवें मालगणी आहे तेथें मल्हारराव परभू महिपतराव यांचे साडू होते त्यांणीं त्यांजला मेजवानी करून एक घोडी मातबर बसावयास दिली. बहुमान वस्त्रें देऊन पंचवीस स्वार बरोबर दिले. तेथें कळलें कीं, सेनाधुरंधर अेलजपुरास

१८. हरिपंताप्रमाणेंच साबाजीचें व दर्याबाईचें महिपतराव दिनकराविषयीं म्हणणें होतें.

१९. एलिचपुरास.

आहेत; तेव्हां उभयतां महिपतराव येऊन पोंहचले. भेटी झाल्या. तसेच भाई इस्मायलखान यास कळलें कीं, महिपतराव उभयतां आलेत. त्यांच्या भेटी झाल्या. हें ऐकून न बोलावितां आपणच त्यांचे मकानास आले. तंव सेनाधुरंधर यांणीं मनसुबा केला जे, सखाराम पंत आपले स्नेही, त्यांचे भेटीस पुरंदरास आपण जावें, सुभेदारांनीं व महिपतराव कासीनीं विनंति केली कीं, "आम्ही तेयूनच आलों. सारे विचार पाहिले. जाणें ठीक नाहीं. कारण साबाजी बोवांनीं त्यांची सारी मसलत उभी केली, तेव्हां मल्हारपंत साबाजी बोवा रुक्नद्दौला व दर्याबाईसाहेब सर्वत्र एक आहेत. सखाराम पंत त्यांचे स्वाधीन हें सर्व आम्ही पाहून आलों. स्वामींचे पुण्यप्रतापांनीं निघणें झालें. सारा विचार झाला, तों मागें धांवणें आलें होतें हें सविस्तर निवेदन केलें." भाईनें ऐकून बोलले जे, "सुभेदारांचें ह्मणणें खरें आहे, आपण जाणें सल्ला नाहीं." तेथून महिपतराव कासीची खानगी सखाराम पंत याजकडे [ सेनाधुरंधरांनीं ] पुरंदरास केली. त्यांचा भाव गैंर्भ समजण्यास्तव केली. हें जाऊन तेथेंच पोंहचले तों पूर्वीं त्र्यंकटराव कासी तेथें होते. याजला महिपतराव दिनकर पळून गेल्यामुळें सखाराम पंतांनीं कैद केलें. याजवरून महिपतराव कासी पंत मशारनिल्हेशीं बोलले कीं, "आपणास इमान दिलें. त्या अन्वयें मुधोजी भोंसले यांजला दादासाहेबांपासून निराळें करून अजलपुरास आणिलें. आणि त्याच उद्देशें आम्ही जाऊन कार्य आपलें केलें, आतां अभिमानी आपण आहेत. मुधोजी भोंसले याचें लक्ष आपल्याकडेस आहे." त्याच अन्वयें पत्रें सेनाधुरंधर यांचीं सखारामपंतास गेलीं. इकडे मुधोजी भोंसले यांजला खर्चाचा अडचण सबब अलजपुराहून उमरावतीस आले. तेथील लोकांचे दंड करून आणिले. आणि कही प्रगण्याच्या खंडण्या घेऊन रोजमुरा लोकांस वांटला. नंतर महिपतराव सुभेदार याचे चिरंजीवाचे लग्नाकरितां चंद्रपुरास जाण्यास निरोप दिला; व मुधोजी भोंसले यांजपाशीं कारभारी महादाजी लष्करी व चिमणाजी रखमांगद चिटणवीस व येसाजी पानलावणें असे राहून त्र्यंकटराव गोपाळ यांजला गंगथडीचा सुभा सांगून फौज नवीन आणावी या निमित्य गंगथडीस रवाना केले. मुधोजी भोंसले अलजपुरीं राहिले. रघोजी भोंसले आणि दर्याबाई आणि हरीपंत फडके, रुक्नद्दौला असे दादासाहेबांचे मागें लागले होते ते बऱ्हाणपुराहून निघोन थोडकेसे जमावानीं सुरतेकडे गेले. साबाजी बोवा

---

२०. अन्तर्गत हेतु.

व हरीपंत त्यांचे मार्गेच होते. त्यांतून साबाजीबोवांनीं हरीपंतांचे आंत्र [ ? ] घेतलें कीं, दर्याबाई साहेबांजवळ फौज सेनाधुरंधर यांची आहे, ती उधळून दिल्ली असतां, मुलाची जात रघोजी भोंसले यांचा बंदोबस्त करणें अवघड नाहीं, हें समजाविलें. त्यावरून पंत मशारनिल्हेचा रुकार पडला. यावरून रुक्कनदवलास अघाडीस सल्ला करून बऱ्हाणपूरचे मुक्कामीं दर्याबाईस लुटलें. ते समयीं रघोजी भोंसले या समागमें निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे व रणसिंग नाईक यांनीं बोलणें वगैरे असे समीप असतां जातीनें रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याणीं जवामार्दी केली. बाळाबाई साहेबांचे हत्तीवरील माहुत गोळीनें मारला. तो हत्ती शत्रूनीं वळवून चालविला असतां शत्रूचा पराभव करून, हत्ती माघारा फिरविला. अशी जवामर्दी जाहली. नंतर रघोजीबोवा व दर्याबाई तापीनदींत उभे राहिले. तेथें हरीपंत फडके जाऊन दर्याबाईचें बहुत समाधान करून आपले लष्करांत रघोजीबोवा सुद्धां आणिले. ते समयीं निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे व दिनाजीपंत सुभेदार असे लाखनवाड्याचे वाटेनें निघाले. अलजपुरास सेनाधुरंधर याजवळ जाऊन पोहोंचले. रणसिंग नाईक निंबाळकर हे आपले जमेती सुद्धां सांभाळून निघाले. ते आपले मुलखाकडे गेले. हरीपंतांनीं कांहीं एक दिवस दर्याबाईस ठेवून रघोजी भोंसले सेनासाहेब यांसहित साबाजी भोंसले यांचे स्वाधीन सन ११८३ चे सालीं केलें. ते बरसातीचे हंगामांत साबाजी भोंसले नागपुरास रघोजीबोवा दर्याबाईस घेऊन आले. इकडे माहिपतराव सुभेदार चिरंजीवाचें लग्न करून अलजपुरास जावें, तंव साबाजीबोवा यांनीं मार्गांत भवानी काळू कारंजावर दहा हजार फौजेनीं ठेविले होते व त्रिंबकपंत सुभेदार उमरावती, भांब वगैरे जिल्ह्यांत होते. आपळाजी नारायण व देवाजी नारायण, सटवाजी भोंसले असे चंद्रपूरचे आसपास माहिपतराव यांस धरावें, याप्रमाणे साबाजी बोवांनीं केलें होतें.

तों इकडे मुधोजी भोंसले सेनाधुरंधर अलजपुरास मसलत पुसण्यासाठीं आले होते. यांजला खर्चाची अडचण पडली. राजगड, भोपाळ इकडील पठाण मुधोजी बुवाजवळ चाकर होते, यांनीं खर्चास मागितलें तें न मिळालें; त्याजवरून राजगडकर पठाणांशीं बोलाबोली जाहली. तों पठाणांनीं अदावत धरून सेनाधुरंधर भाई इस्मायलखान यांचे येथें शहरांत गेले, तेथें जाऊन माघारे येतांना गांवकुसाचे दरवाज्याजवळ एकाएकीं येऊन पडले. स्वारी पालखींत होती. ते समयीं जगदेवराव गुजर व देवाजी डोंगरेदेव व चिमाप्पा चिटणीस समागमें होते. ते पठाणांवर आले. त्यांशीं लढाई जहाली. जगदेवराव

छ ५ जमादिलोवलेस पावून बहुत हर्ष जाहला. सविस्तर वर्तमान गुजराथ प्रांताकडील वगैरे वर्तमान लिहिलें तें कळलें. बहुत समाधान पावून पत्रान्वयें स्वामीआज्ञेप्रमाणें तेच दिवशीं दरबारास जाऊन हजरत नवाबसाहेब यांस सर्व मजकूर राजश्री तात्या आदि सर्वत्रांहीं विदित करून नवाबसाहेब यांणीं अति प्रीति करून श्रवण करून उत्तर प्रत्योतरें झालीं, तीं राजश्री कृष्णराव तात्या जोशी यांणीं तपसिलवार विनंति सेवेशीं लिहिली आहे त्याजवरून विदित होईल. राजश्री पाटीलबावांकडील पत्रेंही सत्वरच येतील, येथें दाखल होतां क्षणींच नबाब बहादूर यांजकडे रवाना करितों म्हणोन आज्ञा केली, तर फार उत्तम आहे. अतःपर हजरतही खेमे[९६] दाखल होण्यास मुहूर्त विचारणा करविली आहे. आर्काट प्रांताचे सरहदेस मिरअल्लीरजाखां यांणीं धामधूम सुरू केल्याचें वर्तमान तात्यांचे पत्रावरून श्रवण होईल. हजरतांचे मुहूर्त एक दोन विचारिले ते रहित जाहाले. कारण पेशजीं सेवेशीं विज्ञप्तिपत्रें लिहितच गेलों, परंतु आतां ही पत्रें आलीं येणें करून सर्व संशयनिवृत्ती जाहली. एतन्निमित्त आतांचा मुहूर्त निश्चयात्मकच सिद्धीस पावेल. सेवेशीं श्रुत होय. विशेष काय लिहावें कृपा लोभाची वृद्धि व्हावी हे विज्ञापना. पौ छ २१ जमादिलावल समानीन हा। अंची ? हैदरखान.

[२४२] श्री.

सेवेशीं गणेश केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत वैशाख शुद्ध द्वादशी पावेतों मुक्काम श्रीरंगपट्टण स्वामींचे कृपावलोकनें करून क्षेम असों विशेष. कृपा करून हजरत नबाब साहेबांचे अं ची वर छ १९ रविलाखरचें पत्र पाठविलें तें छ ५ जमादिलावलीं प्रविष्ट होऊन संतोष जाहला. पत्रीं आज्ञा कीं राजश्री महादजी शिंदे याजकडील निभावणीपत्राचा मात्र गुंता म्हणून लिहिलें. त्यास पंथ दूर, मार्ग सुरक्षित चालेना, सबब इतके दिवस लागले. कालच त्यांचीं पत्रें आलीं कीं, आपण पत्रें व मसुदा पाठविला तो पावला. उर्दईक मसुद्याप्रमाणें पत्रें लिहून रवाना करितों. पत्र थोडके दिवसांतच येईल. येतांच रवाना होईल. तें पत्र येण्याची प्रतीक्षा करूं नये. पत्र आलें ऐसें मोजून तुम्ही व राजश्री कृष्णराव व नरसिंगराव व नबाब बहादूर यांची खातरजमा करून मसलतीवर दरकूच जाणें घडेल ऐसें व्हावें. तुम्ही मंडळीसह कामें उलगडून त्वकर यावें. सविस्तर राजश्री कृष्णराव यांस लिहिलें आहे त्यावरून कळेल. म्हणोन, ऐसियास हजरत नबाब

---

९६. मागें पत्र २३१ पहा. खेमे ! खेकें ! डेरेदाखल या अर्थी हा शब्द असावा.

साहेब यानीं स्वामींचे वचनाचे लायकीवर श्रीमंतांशीं मनःपूर्वक स्नेह केला यांत किमपी दरँज नाहीं. इंग्रजास तंबी बेजार करावयाविशीं अग्रेसर नबाब साहेब यांजकडूनच मसलत ठरली आहे. तेव्हां इंग्रजाचे तंबीची फिकीर नबाबसाहेब यांस पुरती आहे. चैत्र व॥ १३ चा मुहूर्त देखील निश्चय केला होता, परंतु गुजरायेकडील बाजारी वर्तमान नाना प्रकारें बाजारी लोक बोलूं लागले व पुणियाचीं ही पत्रे येतां राहिलीं या करितां तो मुहूर्त टळला. आलीकडे दोन वेळ पत्रे आलीं तीं आम्हीं दरबारास जाऊन श्रवण केलीं. उभयतां सैरदार यांणीं इंग्रजाचा छापा संभाळून कस्त चांगली केली, येणेंकरून संतोषायमान जाहले. नंतर आम्हांस बोलले कीं, रावसिंदे यांजकडील पत्रही आठ चार रोजांत येतांच तुह्मास रजा देऊन आम्ही मसलतीवर नमूद होतों. गुंता नाहीं, म्हणाले. श्रीमंतांस व स्वामींस मातबरांस वस्त्रें जवाहीर नेमून ठेविलें होतें तें आम्हांस प्रत्येक प्रत्येक दाखवून पेटारे बांधून सिद्ध करून ठेविले. हत्ती बदामीस रवाना केले आहेत. आह्मांस येथून रवाना व्हावयास आठ पंधरा रोज पाहिजेत. पर्जन्यकाळ समीप आला. या करितां हत्ती कृष्णापार जाऊन राहण्यास जागा कोणती आहे म्हणून पुसल्यावर आम्हीं अथणी चांगली जागा आहे म्हणोन सांगितलें. तेव्हां बोलले कीं, तेथील कमाविसदार यांत तुम्ही रांतबामसालेविशीं कागद व जासूदजोडी देणें, म्हणजे येथून पत्रें बदामीस पाठवून हत्ती पुढें रवाना होतील. तेव्हां पत्र व जासूदजोडी दिली. त्या समागमें नबाब साहेब यानीं जासूदजोडी व पत्रें रवाना केलीं आहेत. हत्ती अथणीस जाऊन राहतील. आम्हांस रजा जाहल्यानंतर पुढें सेवेशीं घेऊन येऊं. आणखी कित्येक नबाब निजामअल्ली खान यांजकडील व स्नेहभावाचें बोलणें जाहलें तें विस्तारें राजश्री कृष्णरावजी यांच्या पत्रावरून निवेदन होईल. राजश्री पाटीलबावांचें पत्र सत्वरच येईल. पत्र आल्यावर येथें किमपि गुंता नाहीं. आम्हांस निरोप देऊन नबाबसाहेब स्वारीस निघतात. सदैव पत्रीं परामर्ष करावयास आज्ञा जाहली पाहिजे. श्रुत होणें हे विज्ञापना. पैवस्ती छ. २१ जमादिलावल समानीन ह॥ अं [ खं ? ] हैदरखान.

[ २४३ ] श्री.

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि राजश्री पाटील बावांकडून पारशी कलमबंदीची याद आली

---

१७. दरज, दर्ज=फरक.
१८. उभयतां सरदार=शिंदे, होळकर.
१९. रातब मसाला=रतीब मसाला=खाण्याचा व इतर खर्च.

त्याप्रमाणें त्यांच्या लिहिल्यावरून पारशी तहनामा शिक्यानशीं पाठविला आहे. हा इंद्रसेनास दाखविल्यावर मागाहून कलमें ठरावांत आलीं त्याप्रमाणें तहनामा कलकत्याहून येणें यास दिवसगत लागेल, या करितां राजश्री पाटीलबावांनीं श्रीमंतांचे लग्नास जरूर यावें, समागमें इंद्रसेनासही घेऊस यावें. म्हणजे पाटीलबावांनीं इंग्रजांचा वकील श्रीमंताजवळ आणून तह केला असें लौकिकांत चांगलें दिसेल. तों पावेतों त्यांचा तहनामाही येईल व श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वाधीन होण्याचेंही समजेल. अवघ्या गोष्टींस चांगलें. श्रीमंतांचें[१००] लग्नाचे मुहूर्ताचा निश्चय माघ शुद्ध नवमीचा जाहला आहे. लग्नचिट्याही मागाहून येतील. रामजी पाटील व सदाशिवपंत येथें असतां पाटीलबावांचे चित्तांत देशीं येऊन देवदर्शन व श्रीमंतांचें दर्शन घ्यावें असें आहे म्हणोन पुसत होते. त्यास इंग्रेजाचा तह ठरला, तर आतां श्रीमंतांचे लग्नाचे समारंभास आल्यानें फार चांगलें आहे. रा। छ १९ मोहरम. हे विनंती.

[ २४४ ] श्री.

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि. गाडराचें थैलीपत्र आम्हांस आलें होतें त्याचा मजकूर व त्याचें उत्तर लिहिलें तो मजकूर राजश्री पाटीलबावांस कळावयाकरितां पत्र लिहून पाठविलें होतें. त्यावर दुसरें पत्र जाहजांचा सरदार पातशाई इंग्रजाकडील याचें थैलीपत्र आलें होतें त्याचा मजकूर व उत्तर लिहिलें त्याचा मजकूरही लिहून पाठविला होता. त्यास पाटीलबावांच्या पत्राचीं उत्तरें आलीं त्यांत गाडराचे पत्राचा मजकूर लिहिला तो कळला हें उत्तर आलें नाहीं, आणि मागाहून जाहाजांचे सरदाराचा मजकूर लिहिला त्याचें उत्तर आलें आहे. तेव्हां गाडराचे मजकुराचें पत्र पावलें कीं न पावलें हें कांहीं समजलें नाहीं; यास्तव शोध करून लिहून पाठवावें, व श्रीमंतांस आरोग्य जाहल्याचें पत्र पूर्वीं पाठविलें तेंही पावलेंच असेल. रा। छ २ जमादिलावल हे विनंती.

[ २४५ ] ॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि छ. २६ सफरचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री पांडुरंग रघुनाथ यांचीं पत्रें पुरवण्यासुद्धां सहा आलीं तीं पाठविलीं आहेत

---

१००. येथपासून खुद्द नानांचें अक्षर. १ यावरून सवाई माधवराव यांस या वेळीं कांहीं दुखणें झालें होतें असें अनुमान होतें.



अनुक्रमणिका

त्यावरून विदित होईल. राजश्री अंबोजी इंगळे यांचे गांवचे महजराविशीं रामजी पाटील विनंती करतील त्यांस आज्ञा व्हावी कीं, गुदस्त महालकरी यांजपासून पैका घेतला व सालमनकुरीं अं त स्तें [?] घेतलीं आहेत तीं द्यावीं आणि रुपया घेतला आहे त्याच्या यादी कमाविसदाराकडून आणविल्यास येतील. तो जाबसाल आलियावर पत्राची आज्ञा होणें तर व्हावी, म्हणून लिहिलें तें कळलें. त्यास पांडुरंगपंतांचीं पत्रें पाठविल्याप्रमाणें पावलीं. उत्तरें आलाहिदा लिहिलीं आहेत त्यांवरून कळेल. अंबोजी इंगळे यांचे महजराविषयींचा मजकूर लिहिला या अन्वयें रामजीपाटील यांशीं बोलतों. रा॥ छ. २ रविलाखर हे विनंति.

[ २४६ ]　　॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि. किल्ले सालेरचा मजकूर पेशजी राजश्री सदाशिवपंत यांचे पत्रीं लिहिला होता, परंतु पत्रांतील मजकूर जमा धरून उत्तर पाठवावें हें सदाशिवपंत लिहितच नाहींत. त्यास इंग्रजांकडील व दादासाहेबांकडील सूत्रें किल्लेकऱ्यांकडे लागलीं आहेत याजकरितां आम्हांस येथून कळेल तसें करावें लागेल. रा॥ छ. १९ रमजान हे विनंती. पौ॥ छ २९ रमजान भाद्रपद शु॥ इहिदे समानीन मु॥ उजेन.

[ २४७ ]　　॥ श्री ॥

राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि. तुम्ही छ .११ रविलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. गंगाजी राजश्री पाटील बावांजवळ सडे स्वारींत आहे. त्याचें पत्र छ. ५ तारखेचें आलें तेंच बैजिन्नस पाठविलें आहे. त्यांत फौज जमा होऊन इंग्रजास घेरा घालून आहेत व ग्वालेरचें वर्तमान लिहिलें आहे. विदित होईल. म्हणून लिहिलें तें कळलें, व गंगाजीचें पत्र पाहिलें. फौज जमा होऊन इंग्रजावर नित्य लढाई होते, फार उत्तम आहे. पुढें इंग्रज कोणीकडे रोख धरतो व पाटील बावा तर्दुद काय करतात हें लिहून कळवावें. ग्वालेरचा किल्ला घेतला म्हणून लिहिलें आहे त्यास ही गोष्ट मोठीच झाली. ग्वालेर सरकारांत आली येणें करून इंग्रजाचा थारा मातबर मोडला व मनसुब्यासही उपयोग पडला. पुढें होईल तें वरचेवर शोध चांगला करून लिहून पाठवीत जावें. इकडील वर्तमान राजश्री पाटील बावांस लिहून पत्र पाठविलें आहे हें प्रविष्ट करावें. त्या पत्रावरून

---

२ महजर=बादशाही, सनद निवाडा.

३. रामजी पाटील हे शिंद्याचे कारभाऱ्यांपैकीं एक.

४. इंगळे महाळुंग्याचे. यांच्या गांवच्या महजराची भानगड काय होती तें समजत नाहीं.

५. बजिन्नस=तेंच, समक्ष.

६. ‘गंगाजी’ हे कोण ?

स्वामींनीं म्हणजे राजे शाहू यांनीं सत्तावीस महालांचा मोकाशाचा अम्मल करून, या शिवाय दुसरे यांचे महालास उपसर्ग न देऊन, नजर घांसदाणा तुमचा तुम्ही घेणें. आम्ही आपले समागमें राहून व खासगत खर्चास रुपये पन्नास हजार वडिलांनीं द्यावे. पर मुलुखांत तुम्हां समागमें फौजेनिशीं येऊं. खंडणी होईल त्याजपैकीं सरदेशमुखी व बाबती वजा होऊन उरल्या ऐवजाची वांटणी फौजेचे गणतीवर दामाशाई प्रमाणें घेऊं; या शिवाय आमचे कारकीर्दीचें कर्ज सावकाराचें सहा लक्ष रुपये आम्हांवर आहेत, यास दरसाल पाऊण लाख रुपये तुम्ही आम्हास कर्ज वारावयास द्यावे. इत्यादिक मजकूर. या प्रकारें तहनामा जाहला. फसलीचे सन ११४० होतात. नंतर सरकार खेडल्यांत जाऊन बाजीतखानास मारलें, व विजापुराकडेस खंडणीस गेले. हे खंडणीबद्दल स्वारी कांहीं लढाईत जमेत नाहीं तेव्हां कोणता जबाब सवाल असावा ?

२. दुसरी लढाई बंगाल्याची, या मध्यें जुबानी लोकांचे किंजगन्नाथाचे मैदानांत बाजीराव पेशव्यांची लढाई झाली. त्यास सोभामल यांनीं बंगाल्याची हकीकत लिहिली; त्यांत लिहिलें जेः–जेव्हां रघोजी भोंसलेनीं भास्करपंतास साठ हजार फौजेनिशीं बंगाल्याकडे रवाना केलें. सारांश अडीच वर्षें याची लढाई जाहली अखेरीस अलेवर्देखानांनीं दगलबाजीवर इरादा ठेवून बालीभाई व राजे जानकीराम व मुस्तफखान याजला भास्करपंतापाशीं सल्लाह करण्यास्तव पाठविलें. चवथाईचा अंमल देण्याचें कबूल केलें. क्रियाही केली. डेऱ्यास नेऊन भास्करपंतास मारलें. सबब रघोजी भोंसले जातीनें फौज घेऊन बंगल्यास जाऊन मुलुखाची बहुत तैराजी मांडली तेव्हां मानपशहा पातशहाचे आज्ञेवरून बाजीराव पेशवे बंगाल्यांत रघोजीस साहाय्य देण्यास आले. जुबानी, त्या काळीं रघोजी भोंसलेनीं बाजीराव पेशवेशीं बोलणें केलें जेः–महाराजांची आज्ञा व सनद कीं, बंगाल्यांत चवथाई घांस दाणा घ्यावा. त्यास आपण आडवे यावें. आपसांत कलह करावा हें नीट नाहीं. बालके महाराजांनीं आपले नांवें आज्ञापत्र दिल्हे जे बंगाला वैगेरेत आपली फौजही न्यावी. सारांश आज्ञापत्राची नक्कल तेरावे नंबरामध्यें सनदेचे किताबींत आहे.

सन ११४७. रा० रा० बाजीरावपंडित प्रधान यांसि आज्ञा केली ऐशीजे. सुभा प्रांत पटण व प्रांत बांध व रतनपूर व धमद व बाघेलखंड व प्रांत बंगाल तहत पूर्व समुद्र हे प्रांत रा० रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांसि फौजेचे बेगमी बद्दल मोकासे दिले असे, तरि तुम्ही त्या प्रांतीं फौजा न पाठविणें. आपल्या सरदारांस ताकीद करून प्रांतांत उपद्रव लागूं न देणें. मशारनिल्हे त्या प्रांतीं

३ धुळधाण.

जाऊन अमल बसवितील. सुखी असा. या प्रकारें पेशजीच महाराजांचीं आज्ञापत्रें असतां, दुसरें आमची नुकसानें किती जाहलीं. यावर आपण आलांत. अशा प्रकारें भाषण आणि मध्यस्त सरदार संभाजी शिरके व मानसिंग मोहिते वगैरेनीं करून बाजीरावाची समजूत केली. बरकड बंगालेवाल्याशीं बोलणें कसें जाहलें हें कांहीं खुलासा मिळत नाहीं. मिळावा कशास? यांनीं लूटपाट करून जबरदस्तीचे पोटीं मुलूख घेण्याचा इरादा आणि सोभामल लिहितो जे, बारावर्षे बखेडाच बंगाल्यामध्यें लूटपाट लढाई भिडाई राहिली.

रघोजीनें आपला पुत्र जानोजी भोंसलेस बंगाल्यास पाठविलें. याशीं मुस्तफाखां व शेरअंदाजखान व बुलंदखां वगैरे सरदार आलेवरदेखानाचे येऊन जानोजी भोंसल्याशीं भेटले. अलेवर्देखानाचा वृद्धापकाल समीप आला आणि घरची फूट पाहून हें समजून अलेवर्देखानांनीं मीर हबिबाचे विचारानें तीन सुभेची चौथ मराठेशीं कबूल करून सुभे उडसे तमाम भोंसलें यांजला देऊन कौल कराराची मजबुती केली. तेव्हां पासून कांहीं बखेडा जाहला नाहीं. यशवंत रावजीचें बोलणें करून पेशीजे जे समयीं रघोजी भोंसलेनीं वऱ्हाडचा सुभा नामें मुजायतखां जिवें मारला त्या समयीं भोंसले साहेबांस बंगाल्याची मोहीम दरवेश परंतु निजामअल्ली खानांनीं सुभा मारल्याचा राग न धरतां बोलले जे, तुम्ही बंगाल्याकडेस जावें व वऱ्हाडचा मामला तुमचे मामुलाप्रमाणें मिळेल यांत तफावत होणार नाहीं.

३. तिसरी देवगड घेण्यासमयींचा मजकूर, जुबानीं ऐशीजे, चांदसुलतानाची राणी नामें रतनकुंवर यांनीं रघोजी भोंसल्यांस पत्रें पाठविलीं जे, पाहिले पासून तुम्ही आमचे खैरखवा म्हणविता. सुलतान मजकूर मेल्या उपर वल्लीशहाचे लटानें आम्हांस बेसालव मान केलें त्यास तुम्ही बाजमियत येऊन अकबरशहा व बुराणशहा याजला गादीवर बसवून तिघे मिळून हें राज्य खावें. अलीकडे जुबानी ऐकलें जे, अकबरशहा व बुऱ्हाणशहा होते तेव्हां जैगीचे विद्यमानें बोलणें १७९५ वारख्यातकीं तुम्हीं आमची कुमक करून वलीशहाचें पारपत्य करून आम्हांस गादीवर स्थापन केल्यास दहा लक्ष रुपये नगद व तीन परगणे जहागीर देऊं व तुमचे सरकारांत जें काम पडेल तें तुमचे विद्यमानें सवाल जाब करूं. कबुलायतीची नक्कल याप्रकारें आहे तपशील.

कुराण व हजरत पीर दस्तगीर. | राजेश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस.

श्रीसकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित श्री महाराजाधिराजा राजा अकबरसाहेबजी व बुऱ्हाणसाहेबजी, महिपतीराय

देवराजा गुसाई संस्थान देवगड संवत १७९५ वारिखे कारणे तहनामा लिहून दिधला ऐसाजे, वलीशहा राज्यास अनाधिकारी असून जबरदस्तीनें आमचें राज्य करीत होते, याजकरितां आम्हीं आपले साह्यास फौजेनिशीं आणून तुमचे हातून राज्य सोडवून घेतल्यास आपण तुम्हांस कबूल केलें, कलमा बित तपशील:—

१. फौजेस सबतरीख नालबंदी नगद रुपये घेण्याचे वायदे.

| ३००००० | ५००००० | २००००० |
|---|---|---|
| माघ शुद्ध ५ | ज्येष्ठ अखेर | माघ शुद्ध १२ |

१०,००,०००

एकूण दहा लक्ष रुपये सदई वायदे होते.

२. तुमचे राज्यांतील बोलीचाली, तह रद्द करणें, तो तुमचे विचारे करूं तुम्हा शिवाय दुसऱ्याशीं अनुसंधान करणार नाहीं.

किल्ले पवनी बलाय पाळांदुर

३. परगणे मुलतापी बलाय चिखली व ज्याहागीर फुटकर भाईखान दरोबस्त. प्रगणे मारुली दरोबस्त.

एकूण तीन परगणे पानसुपारी बद्दल तुम्हांस व तुमचे वंशपरंपरा दिल्हे असेत. जों पर्यंत आपलें राज्य तों पर्यंत तुम्हांस सदई तीन कलमें लिहून दिलें. या मध्यें तफावत करणार नाहीं. सदई लिहिल्याप्रमाणें करारांत तफावत करूं तर आह्मांस * * ची शपथ असे. हे कबुलियत लिहून दिधली सही. मिती चंद्र ५ शुद्ध माघ संवत १७९५ वारिखे रुजु दफतर दिवाण रघुनाथसिंग.

४. चंद्रपुरची लढाई करून किल्ला घेतला. या लढाईचे पेस्तर चवथ सरदेशमुखीचे दाव्यानें घेऊन देवगडाप्रमाणें भाई वांटणीशा नकाशा ठरवून तहनामा जाहला. त्यांतील गोष्टी ऐशा. तेरा परगणें व पांच पेठा या मध्यें अंमल समाईक, यांची जमा जी काही होईल ती आकारून त्या पैकीं जो खर्च होईल तो बरोबर हिस्सा समाईक करावा; बाकी राहील त्यांत सरदेशमुखी व च्याहारम जाऊन भाई वांटणी कारभार सेनासाहेबांचे दरबारांत व्हावा. शिक्का नीलकंठशहा राजा मोर्तब सेनासाहेबांचें अलाहिदा कमाविस राजे साहेबांकडे सहा महाल एक अमला नलिकंठशहाला बलालपूर एक अमला दिला; आणि किल्ला व शहर वंशपरंपरां लेकरेंबाळें राहण्यास दिला. सन ११४७.

५. सन ११६२ जुबानी यशवंत राव; आज रुयेकी तलव प्रगणें हारव्हा व तळेगांव वैगेरे साबाजी भोंसलेचे नांवे करून घेतलें. परंतु या पैकीं नजर पणेचा व वऱ्हाडाचे महालांतीचा ऐवज व मुगलाई ऐवज दुसालाचा घेतला. सबब शहाजवानखान वैगेरे सरदार पवनार पावेतों आले. रघोजी भोंसले

सरमस्तखान पन्हीचे विद्यमानें तह करून पांच लक्ष रुपये देऊन माघारें फिरविलें लढाई जाहाली नाहीं.

६. जानोजी भोंसले राज्यावर बसले. मुधोजी भोंसले [ यानीं ] कंबर फिसादची बांधली जे:—आम्ही उभयतां मिळून राज्य करूं, या करितां रहाटगांवचे मैदानांत लढाई झाली. या खरखशांत दिवाकरपंत चोरघोडेनी मुधोजी भोंसलेस बोलले जे, कैलासवासी बाबासाहेबांनीं तुमचे वाटणींत चंद्रपूर दिल्हें. तेंच घेऊन असा वृथा कटकट करावी हें ठीक नाहीं. पाहिलें तर न ऐकतां लढाई केली. शेवटीं याच गोष्टीवर समजूत जाहली.

७. सन ११६३ फसलींत जानोजी भोंसलेनीं वऱ्हाड व बालाघाटमध्यें बादशाही खालसे लुटूं लागले, सबब नबाब सलाबत जंगाकडील शवकत जंगाशीं लढाई झाली.

८. सन ११६६ सलाबतजंगाचे पत्रावरून निजाम अल्लीखानाची वऱ्हाडांत जिन्नसी बोरगांवावर बुडविली. एकवर्ष कशमकस होती. नंतर निजामअल्लीखानाशीं पुरणा कांठीं लढाई केली. तेव्हां मात्र जानोजी शिकस्त जाहले. नंतर राजे बहादुरांचे विद्यमानें बोलणें जहालें. निजामअल्लीखानाचे मर्जीप्रमाणें रहावें व कामीं पडावें या करितां देवगड चांदचे जवळ तह जाहला. सन ११६७ फसली पंधराकलमांचा तहनामा ( कलम ) कीं, इंग्रजींत तरजुमा मिस्तर ऐजिक साहेबांनीं केला यावरून समजेल.

९. सन ११७२ हे तेच संधींत राक्षसभुवनची लढाई [ झाली ] या लढाईचे बाद जानोजी भोंसले निजाम अल्लीखानाचे मशवरती मध्यें धसून आपले नबाबापासून नव महाल सरकार पवनार वगैरे ५६६२३५ रुपयांची तनखामध्यें घेतले. याची बजिन्नस सनद निजाम अल्लीखानाचे मोहरानिशी ११७३ फसलींत सनदेचे किताबींत सातवे नंबरामध्यें आहे. याचा तरजुमा आपाजिक साहेबांनीं इंग्रजींत केला त्यावरून समजेल. हासल कलम जानोजी भोंसलेनीं निजामअल्लीखानापासून आपला मतलब करून शेवट राक्षसभुवनचे लढाईचे समयीं पेशवे साहेबांस सामिल जाहले.

१०. सन ११७७ माधवराव पेशवेशीं लढाईचें कारण कीं, तुम्ही मोगलांशीं सामील कां जाहलां होता. हा अर्थ या समयीं बोलणें होऊन जानोजीनीं करार करून दिला. सनदेचे किताबींत बारावे नंबरामध्यें तहनामा कलमबंदीचा आहे. नक्कल यादी जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडील करारमदराचे यादींत मुक्काम मोजे कानकापूर सन्नीध ब्रम्हेश्वर गंगथडी उत्तरतीर सुभा तिसा सितैन मया

यज्ञेशा[30] प्रकटे सुखें सुसमयीं सत्पुत्र तो राम हा ।
कौसल्यात्मज दे खळांस चि भया साधूंसि थोरा महा[31] ॥
कैकेयीसुत केशवांश भरत श्रीमान् सुमित्रासुत ।
नामें लक्ष्मण भव्यलक्षण दुजा शत्रुघ्न विश्वस्तुत ॥ ५ ॥
राकेशाननें[32] ते कुमार चवघे संस्कारिले आपवीं[33] ।
आचार्या भजले तयां गुरु ह्मणे तेजें परां[34] तापवा ॥
भूपें त्यावरि रामलक्ष्मण दिले यज्ञावना गाधिजा ।
ते मारीचसुबाहु विघ्न करिति क्रौर्यें सदा आधि ज्यां ॥ ६ ॥
मर्यादापरिपालनें हरि मुनिस्वांतासि[35] विश्वंभर ।
विद्या तो हि बळा दुजी अतिबळा अस्त्रें हि दे शंभर ॥
मार्गीं मारुनि ताटिकेसि सुभुजा सिद्धाश्रमीं पाडुनी ।
मारीचा प्रभुबाण दूर उडवी पुंखानिळें[36] ताडुनी ॥ ७ ॥
जन्हु स्वर्गनदीपिता[37] नृप तसा जो साधु सीतापिता ।
तो बाहे स्वमखोत्सवार्थ[38] मुनितें ब्रह्मीं मन स्थापिता ॥
राम त्र्यंबकचाप[39] दाखिव असें प्रार्थी स्वयें त्यासि घे ।
विश्वामित्र ह्मणे फिरा खगमृगां सांत्वूनि भक्तां निघे ॥ ८ ॥
यज्वा[40] गाधिज निर्मृगाश्रमपदीं[41] रामा अहल्याकथा ।
सांगे लाववि पादरेणु हरवी तत्पापशापव्यथा ॥
पूजी गौतम दिव्यदारसहित प्रेमें तया वाडवा[42] ।
त्या श्रीशा मग भूप घेउनि शतानंदासि[43] ये आडवा ॥ ९ ॥
जन्म प्राप्तफळ स्व मानि जनक स्नेहें सपर्या[44] करी ।
भंगी त्र्यंबकचाप राघव तया सप्रेम सीता वरी ॥
सामात्या सपुरोहिता दशरथा आणूनि दे ऊर्मिळा ।
भावें पूजुनि लक्ष्मणासि विधिनें शक्राहि जी दुर्मिळा ॥ १० ॥
यक्षाधीश्वरसा[45] सभाग्य जनक भ्रात्यासि सांगे सुता ।
द्याया तो भरता कुशध्वज सुधी जी मांडवी श्रीयुता ॥
शत्रुघ्ना श्रुतकीर्ति दे बहु धनें सर्वांसि ते पूजुनी ।
प्रेमें बोळविती दिली न बहुधा ती जांवयां भू जुनी ॥ ११ ॥

---

३० यज्ञेश=विष्णु. ३१ मह=आनंद. ३२ राकेशानन=चंद्रमुख. ३३ आपव=वसिष्ठ. ३४ पर=शत्रु. ३५ स्वांत=मन. ३६ पुंखानिळ=बाणाच्या पिसाऱ्याचा वारा. ३७ स्वर्गनदी=गंगा. ३८ मख=यज्ञ. ३९ त्र्यंबकचाप=शिवाचें धनुष्य. ४० यज्वा=यज्ञकर्ता. ४१ निर्मृगाश्रमपद=ज्यांतून मृग निघून गेले आहेत असें आश्रमस्थान. ४२ वाडव=ब्राह्मण. ४३ शतानंद=गौतमाचा पुत्र व जनकाचा पुरोहित. ४४ सपर्या=पूजा. ४५ यक्षाधीश्वर=कुबेर.

रागें जे भृगुरामं[46] भर्गधनुच्या[47] भंगें तयाच्या हरी ।
तेजातें प्रभु विष्णु शांतिहनु तो जातां तपातें धरी ॥
केला सावध वृद्ध भूपति मनीं मानी पुनर्जन्म हें ।
साकेतातें[48] करि प्रवेश नमुचिघ्नाचा[49] सखा सन्महें[50] ॥ १२ ॥
मर्त्येश श्वशुरालयासि भरता प्रेषी रिपुघ्ना[51] सह ।
प्रेमें मातुळ[52] ने तयासि समरीं जो शत्रुला दुःसह ॥
छंदें[53] सत्प्रिय बालकांड लिहिला शार्दूलविक्रीडितें ।
श्रीमद्रामयशोलवें परयशें केलीं बहू व्रीडितें ॥ १३ ॥

इति बालकांडः

---

शार्दूलविक्रीडितवृत्त.

तो श्रीमान्नृप यौवराज्य वडिला द्यावें सुता हें वदे ।
ती गुर्वादिजना सुगी[54] तशि जशी शांती सुधा[55] खेवं[56] दे ॥
कैकेयी अभिषेक राहवि बळें तो मंथरेच्या मतें ।
मानीना तिळमात्र जें दशरथ प्रार्थी करी साम तें ॥ १ ॥
दे राज्य स्वसुता चतुर्दश समां[57] रामा वनीं वास ती ।
झाली मागुनि दोन दुर्वर असे हे राक्षसी भासती ॥
मातेचें प्रिय मान्य तो प्रभु करी तें तातसत्यावना[58] ।
सीतालक्ष्मणयुक्त तत्क्षण निघे जोडी यशा पावना[59] ॥ २ ॥
धामें[60] त्यागुनि वल्कली[61] प्रभु पित्या मातांसि वंदी पुसे ।
कैकेयीवरि भूपतीवरि पुरी जी तीवरि श्री रुसे ॥
राजाज्ञप्त सुमंत्र सारथि तिघां ने तो रथीं वाहुनी ।
प्राणी सर्व हि हाय हाय वदले जातां पथीं पाहुनी ॥ ३ ॥
लाज क्षोणिपतीस[62] होय सदनें[63] त्यागी तिचें त्या क्षणीं ।
कौसल्यानिलयासि[64] जाय न धरी धी[65] प्राणसंरक्षणीं ॥
पौरांतें निजल्या स्थळीं त्यजुनि तो गेला प्रभु स्यंदनें[66] ।
तत्पादाब्जरजें[67] निवे गुह सखा जैसा फणी[68] चंदनें ॥ ४ ॥

---

४६ भृगुराम=परशुराम. ४७ भर्ग=शिव. ४८ साकेत=अयोध्या. ४९ नमुचिघ्न=इंद्र. ५० सन्मह=उत्तम आनंद. ५१ रिपुघ्न=शत्रुघ्न. ५२ मातुळ=मामा. ५३ छंद=वृत्त. ५४ सुगी= उत्तम वाणी. ५५ सुधा=अमृत. ५६ खेंव=सुख, आलिंगन. ५७ समा=वर्षें. ५८ तातसत्यावन=बापाचें सत्य राखणें. ५९ पावन=पवित्र. ६० धाम=घर. ६१ वल्कली= झाडाच्या साली नेसलेला. ६२ क्षोणि=पृथ्वी. ६३ सदन=घर. ६४ निलय=घर. ६५ धी= बुद्धि. ६६ स्यंदन=रथ. ६७ अब्ज=कमल. ६८ फणी=साप.

श्रेयस्कामहितीं[69] प्रभूत्तम भजे देवापगेच्यां[70] तटा ।
तेथें सानुज वन्यवृत्ति वळवी दुग्धें[71] वटाच्या जटा ॥
ताताच्या सचिवा पुसोनि उतरे पारीं भरद्वाज या ।
आज्ञा पूजुनि दे द्रवोनि परमा आशी हि देती जया ॥ ५ ॥

धीराराध्यपदांबुज[72] प्रभु भजे श्रीचित्रकूटा नगीं[73] ।
सांगे साश्रु सुमंत्र तें परिसतां भूप त्यजी या जगा ॥
आचार्यें द्रुत आणिला भरत तो मातेसि गांजी वदे ।
पापे मारुनि नाथ तूं न ह्मणसी मातें हि कां जीव दे ॥ ६ ॥

हें मत्कृत्य नव्हे असें सशपथ प्रार्थी रडे तो भला ।
कौसल्या हि रडे तया मग म्हणे वत्सा विधि[74] क्षोभला ॥
तैलांतूनि शरीर काढुनि करी विध्युक्त तातक्रिया ।
संपादी गुरुच्या वचा न वरुनि क्षमा न प्रसूच्यां[75] प्रिया ॥ ७ ॥

तेजस्वी भरत प्रभुप्रति पुरा आणावयाला निघे ।
सर्वामात्य वसिष्ठ पौर जननी आत्मप्रसूतें हि घे ॥
त्यां नौका न दिल्या गुहें प्रभुसखें अक्षौहिणी रोधिली ।
तेव्हां ती शपथांतरें[76] उतरिली जैं धी बरी शोधिली ॥ ८ ॥

गेयज्ञानमहार्णवें[77] मग भरद्वाजें प्रयागीं बरा ।
सत्कारूनि परीक्षिला भरत कीं त्या दुर्यशें घाबरा ॥
पावे सत्वर चित्रकूटगिरितें रामांघ्रिपद्मीं जडे ।
ताताच्या विरहें तयासि रडवी त्याच्या स्वयें ही रडे ॥ ९ ॥

राजन्यप्रवरा[78] पित्यासि भगवान् श्रीराम दे पिंड तो ।
यन्नामें गति देत नारद जडां लोकत्रयीं हिंडतो ॥
यत्पादाब्जपरागमिश्रित महानद्याख्य जें वारि तें ॥ ॥
स्नान स्पर्श हि एकदा हि घडतां उग्रें अघें वारितें ॥ १० ॥

माय प्राकृतबुद्धि कृत्य न इचें चित्तीं धरीं बा पुरा ।
चाल स्वालय शोभवीं यश तुझें हांसो पया कापुरा ॥
ऐसें पुष्कळ तो वदे भरत तों स्वामी म्हणे हा बरा ॥
नोहे आग्रह सत्यधर्म गुरुचा रक्षीं न हो घाबरा ॥ ११ ॥

---

६९ श्रेयस्कामहित=आपलें कल्याण व्हावें अशी ज्याची इच्छा आहे त्याला हितकर अशी. ७० देवापगा=देवनदी गंगा. ७१ दुग्ध=चीक. ७२ धीराराध्यपदांबुज=शहाण्यांनीं आराधन करण्यास योग्य आहे पदकमल ज्याचें असा. ७३ नग=पर्वत. ७४ विधी=नशीब. ७५ प्रसू=आई. ७६ शपथांतर=शपथरूपी मोर, भाडें. ७७ गेयज्ञानमहार्णव=वर्णन करण्यास योग्य आहे ज्ञानरूपी सागर ज्याचा असा. ७८ राजन्यप्रवर=क्षत्रियश्रेष्ठ.

तेरा आणिक एक अब्द सरतां येतों पुरा जा रहा ।
ध्यावा म्यां वनवास राज्य करणें तों त्वां हि बा भार हा ॥
ऐसें ऐकुनि तो म्हणे विनवितों हें सत्य हो मी नया ।
धर्मा दे पदपादुका विसरतां देहास हामीन या ॥ १२ ॥
काम स्वामरवृक्ष[79] पूरवुनि दे सांत्वूनि आज्ञा तया ।
नंदिग्रामवरी विराम म्हणवी साकेत हा ज्ञातया ॥
श्रीस श्रीपद अत्रिदारकर ते कल्पद्रुसे शोभले ।
श्रीरामप्रियभक्त या दुसरिया कांडासि जे लोभले ॥ १३ ॥

इत्ययोध्याकांडः

---

## शार्दूलविक्रीडितवृत्त.

पुण्यश्रीपद भव्य दंडकवनीं श्रीराम मुन्याश्रम ।
पाहे ज्यांत विलोकितां खगमृगां[80] राहे न कांहीं श्रम ॥
भूकन्येसि विराध राक्षस महारण्यांत जातां हरी ।
त्यातें मारिति वीर दाशरथि ते जैसे करीतें हरी[81] ॥ १ ॥
जो धारा शरभंगशांतिस सुखी भेटोनि त्यातें करी ।
भृंगापद्युत त्या सुतीक्ष्णमुनिच्या श्रीराम चित्ता हरी ॥
अर्पी कुंभज[82] देवराजनिहतें चापादि दिव्यायुधें ।
नातें मी पितृमित्र हें कळविलें त्या गृध्रराजें बुधें ॥ २ ॥
जीचे मत्स्य महेंद्रपूजित तया गोदावरीच्या तटीं ।
राहे पंचवटींत तेंवि उटजीं[83] तो दीप जैसा घटीं ॥
क्षोभे शूर्पणखा विरूपकरणें पावे खराख्य क्षया ।
श्रीरामा चवदा हजार किति ते मुंगे तसे लक्ष या ॥ ३ ॥
ती लाज त्यजुनि स्वबंधुसि कथी स्त्रीरत्न साधावया ।
गेल्ये तत्पति तो मला तुज हि बा भ्याला न बाधावया ॥
माझ्या आजि अशा विरूपकरणें हानि प्रतापा यशा ।
केली त्या मनुजें तुझ्या हि पर जे त्यांच्या कथा कायशा ॥ ४ ॥
हा हाय क्षणदाचरेश्वर[84] वदे मायाप्रवीणा बळें ।
मारीचा शिकवी कुबुद्धि मरणा स्वर्णैण[85]तेच्या छळें[86] ॥

---

७९ अमरवृक्ष= कल्पद्रुम. ८० खग=पक्षी. ८१ हरी=सिंह. ८२ कुंभज=अगस्त्य. ८३ उटज=पर्णशाळा. ८४ क्षणदाचरेश्वर=राक्षसराजा. ८५ स्वर्णैण=सोन्याचा हरिण. ८६ छळ= मिष.

मोहीं द्या च म्हणे धरूनि दयिता मार्गे दयाशेवधी ।
लागे राक्षस फार दूर पळतां सोडूनि आशे वधी ॥ ५ ॥
मारी राक्षस हाक हा प्रियतमे हा लक्ष्मणा यापरी ।
सीता निंदुनि देवरासि दवडी तों तीस वैरी हरी ॥
दुष्टा भंगुनि सून सोडवुनियां सत्य प्रतिज्ञा करी ।
तो गृध्रेश जटायु कीर्ति गति ही युद्धीं वरी जी बरी ॥ ६ ॥
खंडूं मर्म जटायुचें दशमुख छेदूनि लंकेप्रती ।
नेतां वानर पांच पाहुनि नगां टाकी मग क्षिप्रें ती ॥
रक्षस्त्रीत अशोकनामकवनीं श्रीजानकी ठेविली ।
देवेशप्रहितान्नलेश दिवशीं तें एकदा जेविली ॥ ७ ॥
बा आज क्षितिजा वनांत उटजीं कां एकली सोडिली ।
त्वां माझी बहु जी मता सतत ती आज्ञा कशी मोडिली ॥
सांगे लक्ष्मण तदुरुक्त निलयीं धांवोनि ये राम हा ।
घोकी श्रीविरहीं चकोर चि गमे मानी न येरीं महा ॥ ८ ॥
हा रायप्रवरात्मजे म्हणत जों सर्वत्र शोधी वनीं ।
तातें व्याकुळ देखतां धडकला शोकाग्नि त्याच्या मनीं ॥
सांगे तो पुसतां जटायु खग म्यां केलें जरी धांवणें ।
सीता नेलि च हाय मद्गति अशी केली खळें रावणें ॥ ९ ॥
ऐसें जन्मलयोपमर्दिचरणा सांगोनि होय व्यसु ।
त्याचें उत्तरकार्य तो करि म्हणे श्रीसत्सभा ज्या वसु ॥
त्या देवीस पुन्हा हि दाशरथि तो शोधी वनीं हा वदे ।
संताप स्मरतां क्षणक्षण तिचा तन्मानसा हाव दे ॥ १० ॥
जी स्वायत्त करावया स्मरवशा रामानुजातें धरी ।
संभोगार्थ अयोमुखी बहु तिची ही दुर्दशा तो करी ॥
नासा कर्ण कुच क्षणांत असिनें खंडी खळांचा अरी ।
क्रौंचारण्य अति प्रसन्न गमलें झालें तदा त्यावरी ॥ ११ ॥
आहारार्थ कबंध योजनभुज क्रूर स्वभावें धरी ।
बाहु च्छेदुनि सानुज प्रभु तया शापाकुळा उद्धरी ॥

---

८७ शेवधि=ठेवा. ८८ देवर=दीर. ८९ खड्ग=तरवार. ९० नग=अलंकार. ९१ क्षिप्र=त्वरा. ९२ प्राहित=पाठविलेलें. ९३ उटज=पर्णशाला. ९४ निलय=घर. ९५ येर=इतर. ९६ मह=सुख. ९७ तात=बाप ( जटायु. ) ९८ व्यसु=मृत. ९९ वसु=धन. १०० स्मरवशा=कामातं. १ आसि=तरवार.

तो सांगे हित तें मनीं धरुनियां प्रेमें मतंगाश्रमीं ।
भेटे श्रीशबरीस सत्कृति तिची घे तोष दे ती श्रमी ॥ १२ ॥
पंपा मन्मथपावकास धमनी झाली प्रभूच्या तदा ॥
त्यातें लक्ष्मण मेघ होय अथवा सद्वैद्य जैसा गदीं ।
श्रीरामें चि अरण्यकांड तिसरा योड्यांत हा आणिला ॥
लीलेनें चि भवप्रचंडविटपी ज्याच्या यशें खाणिला ॥ १३ ॥

इत्यरण्यकांडः

---

## स्रग्धरावृत्त.

तेथूनी श्रीश जातां अनुज सह नगीं ऋष्यमूकासि पाहे ।
त्रासे सुग्रीव धाडी स्वसचिवं हनुमान् तेज त्याचें न साहे ॥
तो भेट विप्रवेषें पुसुनि सकळ तद्वृत्त दोघांसि वाहे ।
पृष्ठीं ने भेटवी त्या प्रभु करि कपिशीं सख्य संतोष लाहे ॥ १ ॥
भूषा दाश त्यजी त्या प्रभुसि सुगळ तो दाखवी बंधु बाहे ।
नेणें कांहीं म्हणे जें नतिपरिचित हें नूपुर स्पष्ट आहे ॥
राम स्नेहें उरीं ते नग धरि भिजवी अश्रुंनीं त्यासि बोधी ।
सुग्रीव त्वत्प्रियें तें हुडकुनि करितों भेटि मी स्वस्थ हो धी ॥ २ ॥
अत्युद्दामप्रताप प्रभु कपिस म्हणे जें तुझें इष्ट कार्य ।
तें आधीं मी करीन प्रमुदित सखया सर्व होवूत आर्य ॥
वैराचा मुख्य हेतु प्रथम मज कथीं तो वदे ऐक रामा ।
मायावीनाम आला असुर धरुनि मद्बंधुच्या घातकामा ॥ ३ ॥
आह्मी हीं जन्यकाम त्वरित उसळलों त्या वधाया खळाला ।
भ्याला दोघांसि एक त्यजुनि समरधी राघवा तो पळाला ॥
लागे पाठीस वाळी द्रुत असुरबिळीं जाय ठेवूनि दारीं ।
मातें कीशेंद्रं मागें खवळुनि शिरला बा घनीं अंधकारीं ॥ ४ ॥
सांगों काय प्रभो तें निरुपम विवरीं लोटला एक अब्द ।
रक्ताचा पूर आला अरिबळरव हि स्वाग्रजाचा न शब्द ॥

---

२ पंपा=सरोवरविशेष. ३ मन्मथपावक=कामाग्नि. ४ धमनी= फुंकणी. ५ गद=रोग. ६ विटपी=वृक्ष. ७ नग=पर्वत. ८ ऋष्यमूक=पर्वतविशेष. ९ त्रासे=भिई. १० सचिव= प्रधान. ११ सुगळ=सुग्रीव. १२ नति=नमस्कार. १३ नूपुर= पैंजण. १४ प्रमुदित=आनंदित. १५ काम=इच्छा. १६ जन्य=युद्ध. १७ समर=युद्ध. १८ द्रुत=सत्वर. १९ कीशेंद्र= वानरस्वामी.

मी किष्किंधेसि शोकें रडत बिळमुखीं अद्रि[20] ठेवोनि आलों ।
मंत्र्याच्या आग्रहानें प्लवगपतिपदीं[21] सिक्त[22] आरूढ झालों ॥ ५ ॥
वाळी वीराग्रणी त्या निवटुनि[23] सबळा स्वाहिता हर्षलाहे ।
येतां बाहेर रामा न मज बिळमुखीं ठेविला अद्रि पाहे ॥
क्षोभे फोडी नगातें अशनि[24]सितदृढस्पर्शमुष्टिप्रहारें ।
देखोनि स्वास्नीं बा अरि गणुनि मला हा त्यजि प्रेम सारें ॥ ६ ॥
लागे सामर्ष[25] मागें वध करिन ह्मणे धांवलों लोक सारा ।
बा म्यां केली क्षमा कीं प्रथमज नग हा तद्गुराधर्ष थारा ॥
वाळी मारूनि दुंदुभ्यसुर उडवि तैं या मतंगर्षि शापी ।
दूषी पुण्याश्रमा तो प्लवग खळ मरो येथ येतां च पापी ॥ ७ ॥
वैरा बीज प्रभो हें बळ हि बहु असे दों मुहूर्तांत संध्या ।
सर्वांभोधींत[26] ज्याची चिरसमय अशी हे प्रतिज्ञा न वंध्या ॥
लीलेनें झेलितो हा गुरु गिरि[27]शिखरें या कसा मारिशील ।
नेणें मातें कसा तूं म्हणासि परि विपत्सागरीं तारिशील ॥ ८ ॥
नेणें नाथ प्लवंगभ्रम विभु करि तें सप्त शालें द्रु[28] भेदी ।
वाळीशीं गांठि घाली प्रभु परि न वधी होय सुग्रीव खेदी ॥
कंठीं बांधूनि वल्ली पुनरपि समरा त्या सुकंठासि धाडी ।
ताडी राहोनि गुप्त प्रखरतर शरें कीशपा यासि पाडी ॥ ९ ॥
निंदी सौजन्यसिंधु[29]प्रति मग विनवी दे स्वपुत्रासि हातीं ।
वाळी जाणे दया नी रघुकुळतिलकीं सर्वदा ती न ताती ॥
किष्किंधाराज्य तारा प्रभुवर सुगळा देवुनि क्लेश वारी ।
सीताशोधार्थ धाडी बहु कपिपति तो मेळवी सैन्य भारी ॥ १० ॥
ने तारेयें[30] स्वयंभूसुतें[31] पवनसुतें[32] प्रेषिले ते यमाशा ।
शोधीं लंघूनि मासा धृतभय वरिति प्राण सोडूनि आशा ॥
तों संपाती तयांतें निरखित दशना काळसा तोंड वासी ।
स्नेहें शोकी जटायु व्यसु परिसुनि हें तो महेंद्राद्रिवासी ॥ ११ ॥
सांगे सूरा[33]तितेजें अनुजसमवनीं कीश हो जो जळालों ।
तो येथें श्रीनिशाकृत्[34]समभिधमुनिच्या आश्रमीं मीं गळालों ॥

---

२० अद्रि=पर्वत. २१ प्लवग=वानर. २२ सिक्त=अभिषिक्त. २३ निवटुनि=मारून. २४ अशनि=वज्र. २५ सामर्ष=सक्रोध. २६ अंभोधी=सागर. २७ गिरी=पर्वत. २८ द्रु=वृक्ष. २९ सिंधु=सागर ३० तारेय=अंगद. ३१ स्वयंभूसुत=ब्रह्मपुत्र. ( वानर विशेष. ) ३२ पवनसुत=मारुती. ३३ सूर=सूर्य. ३४ निशाकृत्=चंद्र.

आज्ञा दाहव्यथेतें हरि करि वस तों या नगीं रामभार्या ।
जों तच्छोध प्लवंगां कथ फुटतिल हे '(त या साध कार्या ॥ १२ ॥
सीता श्रीमत्प्रिया ती दिसति मज दिसे गृध्र[35] दृक्‌ दूर पाहे ।
जातां लंकेसि मार्गी कठिन नवति[36] [37]दिग्योजनें सिंधु आहे ॥
ऐसें सांगोनि गेला उडुनि पवनभू ॠक्षपें[38] सिद्ध केला ।
किष्किंधाकांड रामें लिहवुनि चवथा सर्व सिद्धांस नेला ॥ १३ ॥

इति किष्किंधाकांडः

---

## शिखरिणीवृत्त.

उडे वेगें श्रीमान् पवनसुत दिग्योजनतनू ।
गमे धन्वी[39] स्वामी कपि शर महेंद्राचळ धनू ॥
शिरे तुंडीं व्योमीं[40] भरुनि सुरसेचें मन हरी ।
करी त्वष्ट स्पर्शे न बसुनि हि मैनाकशिखरीं ॥ १ ॥
समुद्रीं घोरा जों बसुनि उडतां सावलि धरी ।
बळें ओढी ग्रासी पवनसुत तीचे असु[41] हरी ॥
सुखें पावे पारा रजनिवदनीं[42] तों कलि[43] करी ।
पथीं लंकादेवी परि झटुनि ती भंगीं[44] चि बरी ॥ २ ॥
शिरे लंकेमध्यें हुडाकि लघु होवोनि भवनीं ॥
अशोधीं पाहे श्री प्रति मग अशोकाभिध वनीं ॥
तितें रात्रि प्रार्थी दशवदन ती धिक्कृति करी ।
म्हणे वृक्षीं साध्वी प्रभुसि उचिता हे बहु बरी ॥ ३ ॥
स्तवी त्या राजश्रीप्रति तिस सुविश्वासद वदे ।
नमस्कारीं जातां रजनिचर[45] मुद्रा[46] प्लवग दे ॥
कथी एकांतीं ती कुशल मग संदेश[47] मणि घे ।
करूनि श्रीरामागमनविषयीं निश्चय निघे ॥ ४ ॥
द्रुम ध्वंसी यत्नें खेचरपतिसंपादित[48] बळें ।
वधी युद्धीं अक्षीं[49] दशवदनपुत्रास हि पळें ॥
धरूं दे ब्रह्मास्त्रें करुनि घननादीं[50] मग बळें ।

---

३५ दृक्=दृष्टि. ३६ नवति=नव्वद. ३७ दिक्=दहा. ३८ ऋक्षप=अस्वलांचा स्वामी. ३९ धन्वी=धनुर्धारी. ४० व्योम=आकाश. ४१ असु=प्राण. ४२ रजनिवदन=निशामुख (सायकाळ) ४३ कलि=भांडण. ४४ भंग=पराभव. ४५ रजनिचर=राक्षस. ४६ मुद्रा= अंगठी. ४७ संदेश= निरोप. ४८ खचर=पक्षी. ४९ अक्ष=रावणपुत्र विशेष. ५० घनना द=इंद्रजित्.

वदे भावी सर्व क्षय वदवितां दापुनि खळें ॥ ५ ॥
प्रदीप्त क्रूरात्मा हंसुनि करवी पुच्छ सहसा ।
उडे जाळी लंका कपिवर करी भूसि स[51]हसा ॥
पुन्हा श्रीसीतेतें पुसुनि अचळीं वेघुनि उडे ।
तळीं भूच्या भारें दडपुनि जरी तो गुरु बुडे ॥ ६ ॥
महाहर्षी मग्न प्लवग करि भेटोनि कळवी ।
खळांचीं तोंडें जें करुनि तरुभंगादि मळवी ॥
समुत्साहें प्याले म[52]धु मधुवनीं भक्षुनि फळें ।
वनाध्यक्षा त्या ही बहु दधिमुखा ताडुनि बळें ॥ ७ ॥
पुढे ठाके ज[53]ल्पे दधिमुख सुकंठा जवळि तें ।
कपींचें सैन्य त्वन्मधु मधुवनींचें कवळितें ॥
न कोपे सांत्वी त्या स्वभटकृतकृ[54]त्यत्व कळलें ।
ह्मणे जा येऊं दे स्वबळ मज वाटे न मळलें ॥ ८ ॥
महेशध्येयश्रीचरण हृदया मानि धरूनी ।
त्वरेनें आले ते कपिभट महत्कार्य करुनी ॥
सुकंठा श्रीरामा अनुजसहिता वंदुनि उभे ।
पुढें ठेले ज्यांची स्मृतिसु[55]रभि सर्वे[56]प्सित दुभे ॥ ९ ॥
प्रभूच्या कंजश्रीहरपदयुगीं तो कपि कवी ।
माणि स्थापी हा तें परम सुख जें तोक पिकवी ॥
तया आलिंगी श्रीरमण करि लोभा जनकसा ।
नव्हे प्रेमें दास्या जपुनि सुयशोभा[57]जन कसा ॥ १० ॥
ह्मणे मी काय त्वत्कृतसदृश देऊं तुज कपे ।
ऋणी झालों आम्हीं दिन[58]मणिपुढें कोण न लपे ॥
असें वर्णि प्रेमें प्रभु बहुत लाजे सुकवि तो ।
मरु[59]त्पुत्र ज्ञाता निजनुतिस यत्नें चुकवितो ॥ ११ ॥
कथी विश्वाराध्या पवनसुत तो जोडुनि कर ।
प्रियेच्या संदेशा विनवुनि शशी सोडु[60]निकर ॥
यशा लाजो तूतें विनविति पहा या सह सती ।
पुसोनि प्रेमानें शि[61]वें तुज साहायास हसती ॥ १२ ॥

---

५१ सहसा=हास्ययुक्त. ५२ मधु=मद्य. ५३ जल्पे=भाषण करी. ५४ कृतकृत्यत्व=धन्यता. ५५ सुरभि=कामधेनु. ५६ ईप्सित=इष्ट. ५७ भाजन=पात्र. ५८ दिनमणि=सूर्य. ५९ मरुत्पुत्र=मारुती. ६० सोडुनिकर=( स+उडु+निकर ) नक्षत्रसमूहासह. ६१ शिव=कुशल.

निघावें त्या मत्ता वधुनि जिववाया स्वदयितें[६२]ती।
यशा रक्षीं दुःखा द्रुत हरोनि नित्यातिशयिता ॥
स्वयें रामें कांड स्वगुणमय हा सुंदर महा।
सुखें केला पूर्ण प्रणतवरदें पंचम महा ॥ १३ ॥

इति सुंदरकांडः

---

## शिखरिणीवृत्त

पुसे त्या वीरा श्री रघुपति कसें वर्त्में[६३] अरिचें।
कसें सैन्यस्थान प्रकृ[६४]तिमत साहित्य वरिचें ॥
कथीं सारें अन्या कठिन तुज तें सर्व सुगम।
जयश्रीचा बा तूं रणनिपुण आहेसि उगम ॥ १ ॥
सुलभीं त्या वीरा रथ करि बसे अंगदरथीं।
सुमित्रेचा पुत्र प्लवगबळ गर्जे बहु पथीं ॥
ससुग्रीव श्रीमान् जलधितटे[६५] पावोन उतरे।
ह्मणे त्या सिंधूतें प्रभुकटक गर्वें न उतें[६६] रे ॥ २ ॥
न मानी जो साम त्यजुनि नयधर्म स्मरवश।
तशा मत्ता त्यागी तदनुज तया दे पद यश ॥
समुद्रातें त्रासी प्रभुवर महास्त्रें स्थळकरें।
तदुक्तें सेतूतें करवि शत गांवें[६७] नळकरें[६८] ॥ ३ ॥
स्वयें रक्षोराज प्लवगबळ पाहे उतरलें।
हतौजौं[६९] केला तो प्रथम चि सुकंठें सुतरलें[७०] ॥
न मानी कांहीं तें परम हित जें अंगद वदे।
तया श्रीमान् जैसा वनगजकुळा भंग दैवें दे ॥ ४ ॥
प्रवीरांचा होय क्षय जरि पुन्हां ही पुर जळे।
तरी सीता द्याया परतुनि न तो दुर्मति वळे ॥
प्रभू दोघे बांधी घनरव महीजा-धृति[७२] गळे।
फणाभृत्पाशो[७३]ग्रव्यसन खगराजे[७४]क्षित टळे ॥ ५ ॥
सुमित्रापुत्रोरा करुनि अरिशक्ति क्षत पळें।

---

६२ दयिता=प्रिया ( स्त्री. ) ६३ वर्त्म=मार्ग. ६४ प्रकृति=प्रजा, प्रधान. ६५ जलधि=सागर. ६६ न उत=माजूं नको. ६७ गांवें=योजनें. ६८ नळ=वानरविशेष. ६९ हतौजा=निस्तेजस्क. ७० सुतर=चंचल. ७१ दर्प=घमेंड. ७२ धृति=धैर्य. ७३ फणाभृत्पाश=सर्पपाश. ७४ खगराज=गरुड.

वरी मूर्छेतें तो रघुतिलक धैर्या सह गळे ॥
खळातें लीलेनें विरय करि दे मार्ग निघ रे ।
ह्मणे मागें नाय द्रुत परिभवें शत्रु विघरे ॥ ६ ॥
स्वचक्रीं जो होम प्लवगकटकाचा करि धरी ।
कपीशा तो नासा श्रुतियुग नयाचें लघु हरी ॥
फिरे क्रोधें त्यातें स्वयश विभु गाया चिर वधी ।
सुख स्वर्गी झालें असुख दशतुंडीं निरवधी ॥ ७ ॥
घनध्वान स्वौजें प्रकटि विशिखांहीं बळ खिळी ।
तदस्तब्रह्मास्त्र प्रभुयुगळतेजस्मृति गिळी ॥
महात्मा ऋक्षेश स्तुत वर यशें सर्व निववी ।
मरुत्पुत्र स्वौषध्यगशिखर आणूनि जिववी ॥ ८ ॥
वधाभासें हाय प्रभुसि जलदध्वान वदवी ।
रणीं दावी त्याला अनुज विभुचा मृत्युपदवी ॥
महीजा माराया कुमति सुतशोकें धरि असी ।
सुपार्श्वे त्या केली फिरवुनि परें कीर्ति न असी ॥ ९ ॥
पुन्हा रक्षोराजप्रहितखरशक्तिक्षत बरा ।
विभुभ्राता केला पवनतनयें आणुनि धरा ॥
शिरच्छेदें भागे प्रभु बसुनि ही वासववरथीं ।
मथी त्या नें सांगे मुनि मनु म्हणे भास्कर मथीं ॥ १० ॥
दशास्यींचा काय प्रभुतिलक संस्कारवि बळें ।
पदीं त्याच्या भ्रात्या बसवि अभिषेचून सुजळें ॥
करी देवी दिव्यें त्रिदशपितृवाक्यें मग तितें ।
भजे मेल्यां कीशां उठवुनि वरी कामगतितें ॥ ११ ॥
सखे ते घे तारामुख कपिवधू ही शुभरता ।
भरद्वाजा भेटे निववुनि गुहा आशु भरता ॥
सुलभीं स्वीकारी पितृपद करी राज्य बरवें ।
प्रजा मोही गातां कुशळ हरिणां तेंवि न रवें ॥ १२ ॥

---

७५ कटक=सैन्य. ७६ श्रुति=कान. ७७ निरवधि=अतिशय. ७८ मेघध्वान=मेघनाद (इंद्रजित्). ७९ स्वौज=आपलें तेज. ८० विशिख=बाण. ८१ तदस्त=त्यानें सोडलेलें. ८२ अग=पर्वत. ८३ असि=तरवार. ८४ प्रहित=पाठविलेली, सोडलेली. ८५ वासव=इंद्र. ८६ मनु=मंत्र ८७ आस्य=मुख. ८८ दिव्य=अग्निप्रवेशरूप दिव्य. ८९ त्रिदशपितृवाक्यें=देव व बाप यांचे सांगण्यावरून. ९० कीश=वानर. ९१ वधू=स्त्रिया. ९२ आशु=सत्वर. ९३ रव=शब्द.

नवांभोदश्याम स्मरशतसहस्राधिकरुची[९४] ।
स्वनामें सर्वार्थप्रद करि यशें जो जग शुची ॥
तया रामें कांड श्रवणहित युद्धाख्य रुचिरें[९५] ।
स्वयें केला पूर्ण प्रणत सुखवायास सुचिर ॥ १३ ॥

इति युद्धकांडः

---

## स्रग्धरावृत्त

सांगे रामा कथा श्रीघटजें[९६] सुत पुलस्त्यर्षिचा विश्रवा या ।
आद्या वित्तेशमाता[९७] विमळमति भरद्वाजपुत्री सुजाया ॥
राजा झाले दशास्यप्रमुख सुत तिघे त्या दुजा केकसीतें ।
उग्रत्व ब्रह्मदत्तें दशवदनिं वरें होय जें ऐकसी तें ॥ १ ॥

आधीं लंकापहारा करुनि गुरुसि दे ताप जिंकूनि पापी ।
त्याच्या घे पुष्पकातें[९८] द्रविणपति[९९] तसा तो हि नंदीशें[१००] शापी ॥
बाहू कैलासमूळीं रगडि विनवितां आशुतोषेश[१] सोडी ।
पावे तें रावणाख्या[२] दशमुख न वधी त्यासि जो हात जोडी ॥ २ ॥

जीतें झोंबे सकाम त्यजुनि विनय तो केवळ क्रूर पापी ।
जन्मेन त्वद्वधा मीं गुरुतनयसुता[३] ती असें त्यासि शापी ॥
आत्मा वन्हींत होमी तदुपरि खिजवी त्या मरुत्ता हि राजा ।
त्यातें संवर्त्त वारी वधि मखें[४] मिलिता सन्मुनीच्या समाजा ॥ ३ ॥

मद्वंशोत्पन्नतेजस्विवरदशरथापत्यरामप्रतापें ।
युद्धीं होशील भस्म स्वजन सह महादुर्मदा तूं स्वपापें ॥
ऐसें शापी महात्मा नरपति अनरण्याख्य दिक्कंठें[५] पाडी ।
ज्यातें पाणिप्रहारें न गणुनि हृदयीं वाक्शरांनीं हि ताडी ॥ ४ ॥

घाता काळ स्वकीय प्रहरणवर[६] घे त्यासि वारी विधाता[७] ।
जिंकी सर्पेश्वरांचें[८] पुर मणिपुर जें होय त्यातें हि जाता ॥
ब्रह्मा सांगे निवातोत्तर कवच बळी सख्य यांशीं कराया ।
आरंभी काळकेयां सह रण भगिनीप्राणनाथा[९] मराया ॥ ५ ॥

---

९४ रुचि=कांति. ९५ रुचिर=सुंदर. ९६ घटज=अगस्त्य. ९७ वित्तेश=कुबेर. ९८ पुष्पक=विमान विशेष. ९९ द्रविणपति=कुबेर. १०० नंदीश=शिव. १ आशुतोषेश=लवकर प्रसन्न होणारा शिव. २ आख्या=नांव. ३ गुरुतनयसुता=बृहस्पति-पुत्र-कन्या. ४ मख=यज्ञ. ५ दिक्कंठ=दशमुख. ६ प्रहरण=आयुध. ७ विधाता=ब्रह्मा. ८ सर्पेश्वर=शेष. ९ भगिनीप्राणनाथ=बहिणीचा नवरा.

ऐके सत्यस्थ नीराधिप वरुण असें तत्सुतांतें चि मोडी ।
जीच्या दुग्धाब्धि दुग्धें निरखुनि सुरभी[10] तो तितें हात जोडी ॥
पाहे ज्या रम्यरूपा दशमुख हरि त्या देवराजर्षिकन्या ।
त्या तैं हो स्त्रीनिमित्तें तव वध ह्मणाति क्रोध पावोनि धन्या ॥ ६ ॥

ऐकें लंकेंत धाम प्रचुर मिळविलें मेघनादें तपोनी ।
ब्रह्मादीशांसि भावें भजुन बहु महा यज्ञकर्मी जपोनी ॥
बाळा कुंभीनसी ही उडविलि मधुनें स्वस्वसाहें हि कोपें ।
संगें अक्षौहिणी घे खयुग[11]शतमिता लोक ज्या सर्व सोपे ॥ ७ ॥

दैवें आश्चर्य ओजस्विं[12] मधु सह घडे सख्य रंभा बळानें ।
भोगी भ्रातृव्यें[13] शापी बळरति करितां या मरावें खळानें ॥
देवांशीं युद्ध होतां घनरव धरि ने शक्र लंकेसि गोडी ।
ब्रह्मा त्याशीं करी दे वर मखज रथा मृत्यु तेव्हां चि सोडी ॥ ८ ॥

त्या ही बांधोनि हाय व्यसु[14] वर ह्मणवी अर्जुन[15] क्षोणिपाळ[16] ।
रोधी कक्षेंत वाळी प्लवगपति हि जो अंबुधिस्नानकाळ ॥
सेवीं श्रीमारुतीचें चरित शिशु उडे जो फळ ब्रध्नें[17] मानी ।
पाडी वज्री[18] हि कोपे पवन चुकवि ती आत्मभू[19]प्राणहानी ॥ ९ ॥

प्रेषी पूजूनि राजद्वय पवनसुता सद्वर श्रीश अर्पी ।
निंदा ऐकोनि सीता त्यजि लवणें[20]वधें सद्यशें विश्व तर्पी ॥
शूद्रा मारी द्विजाचा मृत सुत उठवी श्वेत सत्कीर्ति सेवी ।
काव्यज्ञ[21] स्वाश्वमेधीं कुश लव सुत दे जाय भूमींत देवी[22] ॥ १० ॥

आठां पुत्रांसि दायें[23] प्रभु सदय दे आठ राज्यें तदा ते ।
काळें केले सुबंधु त्यजवुनि विरस श्रीश जाया पदातें ॥
श्वो[24]लूक[25]न्यायकर्त्ता परम सदयधी आणवी भक्त सर्व ।
प्रेमें सांत्वी प्रजांतें प्रिय करि नुरवी काम तो जेंवि शर्व ॥ ११ ॥

सर्वां जीवांसि धीशासुलभ सुगति दे ने प्रजा गोप्रतारीं[26] ।
तीर्थीं स्नातां विमानीं बसवि वसवि संतानकीं[27] लोकसारीं ॥
झाले दिव्यस्वरूप प्लवग [28]किटिखरें[29]श्वानमार्जारदेही ।

---

१० सुरभी=कामधेनु. ११ खयुगशतमित=२००. १२ ओजस्वि=तेजस्वी. १३ भ्रातृव्य=भावाचा मुलगा. १४ व्यसु=मृत. १५ अर्जुन=कार्तवीर्य. १६ क्षोणिपाळ=भूपति. १७ ब्रध्न=सूर्य. १८ वज्री=इंद्र. १९ आत्मभू=पुत्र. २० लवण=राक्षसविशेष. २१ काव्यज्ञ=वाल्मीकि. २२ देवी=सीता. २३ दाय=वांटा. २४ श्वा=कुत्रा. २५ उलूक=घुबड. २६ गोप्रतार=तीर्थविशेष. २७ संतानक=कल्पवृक्ष. २८ किटि=डुकर. २९ खर=गाढव.

त्या पर्वीं पावले ती गति खानि सरयू कटि जे धन्य ते ही ॥ १२ ॥
जो ठेवी भक्तनाम प्रणतसमवनैं[30] जाय वैकुंठलोका ।
श्रीमद्वाल्मीकिगीत स्वयश हि सकळा संहरायासि शोका ॥
त्या रामें उत्तराख्य द्रवुनि लिहविला सातवा कांड हा कीं ।
जे प्रेमें सेवितील स्तवितिल अमृत प्राशितें त्यांस नाकीं ॥ १३ ॥

इत्युत्तरकांडः

---

## उपसंहार

### शार्दूलविक्रीडितवृत्त

जो अत्यद्भुत साधुगीत महिमा गंगाप्रवाहीं वसे ।
प्रेमें स्वल्प कुपींत गांगें[31] भरिलें जें त्यांत ही तो असे ॥
श्रीरामायणवर्त्तिसत्सुकृत या ग्रंथांत आहे तसें ।
श्रीरामप्रियभक्त साधु रसिक स्वांतांत पाहे रसें ॥ १ ॥
भावें वंदुनि रामचंद्रचरणीं म्यां ग्रंथ हा वाहिला ।
कीं या चि प्रभुनें प्रपन्नें[32] जन जो तो बंधुसा पाहिला ॥
उच्छिष्टें बदरें[33] महामखपुरोडाशाधिकें लक्षिलीं ।
ताराया शबरीस साधु ह्मणतों अत्यादरें भक्षिलीं ॥ २ ॥
श्रीरामायण सर्व साधुमतिस स्त्रीधीस माहेरसें ।
कीं हो प्राकृत संस्कृत प्रिय चि तें पाहोनि पाहे रसें ॥
जो ऐसा प्रभु त्या जना न विचकू दे दांत बाहे रहा ।
वैकुंठीं च ह्मणे प्रसन्न चि सदा ही आंत बाहेर हा ॥ ३ ॥

### स्त्रग्धरावृत्त

स्तन्य[34] स्वस्थ प्रसूचें सकळ हि करितांना न आ बाळ लाहे ।
वार्ता कोणा न मानी कुशळ सुरभिचा वत्स आबाळला हे ॥
प्रेमें पाळी कधीं ही निज गुण न म्हणे माय गा बाळकाला ।
व्हावा चि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गाबाळ काला ॥ ४ ॥

### शार्दुलविक्रीडितवृत्त

मानील प्रभु रामभद्र हृदयीं या तोक विप्रा कृत ।
ग्रंथा वानिल तो म्हणेल न वृथा गातो कवि प्राकृत ॥

---

३० समवन=रक्षण. ३१ गांग=गंगेचें पाणी. ३२ प्रपन्न=पीडित. ३३ बदरें=बोरें
३४ स्तन्य=स्तनांतलें दूध.

ऐसा नित्य अति प्रसन्न दुसरा दाता न दीनावरी ।
ज्याची पादभवा[35] हि इष्टवरदा हाता नदी नावरी ॥ ५ ॥

## शिखरिणीवृत्त

जशी देवा सेवा स्तुति बहु रुचे साधु वदती ।
नसे अन्या धन्या मिळवुनि न दे क्षिप्र पद ती ॥
सदा नव्यें भव्यें प्रभुयश चि दे देति सवें[36] ते ।
फळें आमें नामें प्रभु चि न असे यज्ञ सवतें[37] ॥ ६ ॥
सदां गावें सीतारमणयश हा योग बरवा ।
रवा या साधी जो जन धरि पराची न परवा ॥
रवा नामाच्या भी भव कलि कथा काय गमला ।
मला न श्रेष्ठा ही गुरु ह्मणुनि देवर्षि रमला ॥ ७ ॥

## शार्दूलविक्रीडितवृत्त

गावें रामचरित्र सादर सदा म्यां हा वराया वर ।
श्रीरामप्रियभक्त हो विनवितों प्रेमा करा यावर ॥
जैसा वारिदँ[38] चातका प्रति सुधेचीं[39] त्या खगीं[40] आकर[41] ॥
युष्मत्सद्गुण ही तसा म्हणतसे रामात्मजो[42] आ कर ॥ ८ ॥
नामातें प्रभुच्या मयूर विनवी चित्ता भरीं या भरीं ।
श्रीरामायण गायिलें तरि पुन्हा गावें चि ऐसें करीं ॥
पापाचा परिहार फार बरवा व्यापार हा साधुनी ।
गावायासि सदैव या मम मुखीं बापा रहा साधुनी ॥ ९ ॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं रम्यमंत्ररामायणं संपूर्ण.

---

३५ पादभवा=पायासून निघालेली. ३६ सव=यज्ञ. ३७ सवते=वेगळे. ३८ वारिद=मेघ. ३९ सुधा=अमृत. ४० खग=पक्षी. ४१ आकर=खाण. ४२ रामात्मज=रामचंद्रपुत्र मोरोपंत.



अनुक्रमणिका

## ७४ वें द्वितीयं दोहारामायण.[1]

श्रीरामाचें चिंतितां प्रेमें पदराजीवें[2] ॥
बा वेद ह्मणे सर्वथा पावे न दरा[3] जीव ॥ १ ॥
श्रीरामाचें वारितें पातक सारें नाम ॥
सकृदु[4]च्चारें तारितें सर्व पुरवितें कामं[5] ॥ २ ॥
निववीतें जें पावतें बहु मानस खेदास ॥
पावति या प्रभुचे जसे बहु मान सखे दास ॥ ३ ॥
पीयूषांहुनि[6] शतगुणें रामाचें यश गोड ॥
याचें उदारपण ह्मणे मंदरा[7] कर जोड ॥ ४ ॥
गाधितनुजमख[8] रक्षिला उद्धरिले मुनिदार[9] ॥
ईश्वरधनु[10] भंगुनि दिलें सुख सीतेला फार ॥ ५ ॥
भृगुरामाचा[11] शमविला प्रळयानळसख[12] कोप ॥
लोक स्वयशीं रमविला करुनि असत्पथलोप ॥ ६ ॥
गुरुसत्यव्रतरक्षणा[13] करितां तत्क्षण राम ॥
प्राप्त हि राजपद त्यजी गतसार[14] जसें दामें[15] ॥ ७ ॥
सीतालक्ष्मणसह निघे त्यजुनि अयोध्याधाम ॥
वनवासा बहु आदरी तनवासा[16] श्रीराम ॥ ८ ॥
देता झाला पादुका सेवालाभरतास[17] ॥
देउनि तिळजळ दशरथा देवाला भरतास ॥ ९ ॥
भरत परतला मुनिजनीं पीडा मग पाहून ॥
निघे चित्रकूटाख्य जो प्रभू त्या नगपाहून[18] ॥ १० ॥
निववी घटज[19]प्रमुख ने सुव्रत नव नव संत ॥

---

१ माधव चंद्रोबा यांनीं जें रामायणांचें एक पुस्तक छापलेलें आहे त्यांत एक दोहारामायण आहे. तें याहून अगदीं भिन्न आहे. त्यांत १०९ दोहरे आहेत व यांत ८४ आहेत. २ राजीव=कमल. ३ दर=भीति. ४ सकृत्=एकवार. ५ काम=इच्छा. ६ पीयूष=अमृत. ७ मंदर=कल्पवृक्ष. ८ गाधितनुजमख=विश्वामित्राचा यज्ञ. ९ दार=स्त्री. १० ईश्वर=शिव. ११ भृगुराम=परशुराम. १२ प्रळयानळसख=प्रळय काळचे अग्नीसारखा तीव्र. १३ गुरुसत्यव्रतरक्षणाकरितां=बापाचें वचन खरें करण्या करितां. १४ गतसार=वाळलेली. १५ दाम=माळ. १६ तनवास=वल्कलें धारण करणारा. १७ सेवा-लाभ-रत=सेवेची प्राप्ति इच्छिणारा. १८ नगप=पर्वतश्रेष्ठ. १९ घटज=अगस्त्य.

अनुक्रमणिका

आलिंगनादिविहितप्रतिमध्यविघ्नमाह स्म तां समधुरस्मितसुंदरास्यः ॥ ४६ ॥
पश्य प्रिये विपिनसीम्नि विजृंभमाणामृद्धिं मधोरिषुममोघतमां स्मरस्य ॥
अन्यादृशं मम मनः कुरुते किलैषा त्वन्नेत्रवृत्तिरिव भिन्नजनांतरंगा ॥ ४७ ॥
अस्याः कथं नु कथयाम्यनुभावमुच्चैर्येन त्रिलोचनविलोचनसंहृतोऽपि ॥
उज्जीवितः कृतजगज्जयकौतुकश्रीरुज्जृंभते सुमुखि संप्रति पुष्पकेतुः ॥ ४८ ॥
द्वेधा विभक्ततनुरत्र वसंतलक्ष्मीरेषा लतासु विटपिष्वपि सन्निधत्ते ॥
पश्य त्वदंगमनसोरिव यौवनश्रीस्तत्सुंदरि त्वमिव रम्यतरा वनालिः ॥ ४९ ॥
एते द्रुमाः स्फुटितकुड्मलमग्नभृंगीलीलाविकस्वरमृदुस्वरगीतिभेदैः ॥
वैतालिका इव रतेः परिणायकस्य[26] व्यामोहयंति भुवनं वरवाणिरूपे ॥ ५० ॥
भित्वा भुवं भुवनतः पवनाशनानां[27] नामंतश्चिराय निबिडस्तिमिरप्रकांडः ॥
वैभाकरीमिव विभामपिधित्सुरुच्चैरुत्तिष्ठति स्फुटतमालकुलच्छलेन ॥ ५१ ॥
लुब्धान् विजित्य नृपतीन् प्रसभं हृतायाः पित्रा स्वयं सुमुखि नः प्रणयान्निबद्धः ॥
धम्मिल्लभार इव सागरमेखलायाः संमोदमेष वितनोति तमालसालः ॥ ५२ ॥
माकंदकंदलरसायनमंदितानामाकर्ण्यते कलरवः कलकंठयूनां ॥
वल्लीगृहोदरवसद्वनदेवतानां प्रेंखद्विपंचिभिर्भवपंचममूर्च्छनेव ॥ ५३ ॥
किंचिद्वचः किरसि चेदधुना कृशांगि संकोचयिष्यति पिकः स्वगिरं जवेन ॥
कस्तादृशो जगति येन विजेतुरग्रे त्यक्त्वा त्रपां निजगुणाः प्रकटीक्रियंते ॥५४॥
उत्सारितः परिसरप्रसरद्द्विजालीपक्षोदितेन मरुता नवविद्रुमश्रीः ॥
आकाशवीथिवनिताकुचकुंकुमत्वमालंबते विकचवंजुलरेणुराशिः ॥ ५५ ॥
व्याप्तं दिशासु मृदुकेसरकेसरोत्थं दृष्ट्वा परागपटलं तुहिनर्तुबुध्द्याः ॥
पीतांबरावृत इवैष चकास्ति चूतः पुष्पैर्निरंतरभवैरविचारशून्यः ॥ ५६ ॥
आलोलभृंगतरुणीजनपानभूमिरालोक्यतां कमलगंधिनि गंधसारः ॥
साधारणादखिलशाखिषु पुष्पगंधादन्योऽपि कश्चिदमुकं विशिनष्टि गंधः ॥५७॥
उद्वर्तितः सरसपेषणपूर्वमस्य मज्जा निमज्जयति चित्तमपीश्वराणां ॥
आल्हादनाभनि सरस्वति सारसाक्षि क्वैतादृशस्तरुरशेषजनोपकारी ॥ ५८ ॥
अत्रत्यचंदनतरूष्ववलंबनाय सर्पंति ये क्षितिपनंदिनि सर्पशावाः ॥
सौवर्णवेदि रुचिनिर्मितचंचलाभिः संभीषिताः सपदि ते विमुखीभवंति ॥ ५९ ॥
पक्त्रैरियं निजफलैः प्रतिपर्वजातैर्बिंबीलता विपिनसीमनि लंबमाना ॥

---

२६ परिणायकः=पतिः २७ पवनाशनः=सर्पः २८ अपिधित्सुः=तिरोधानं कर्तुमिच्छुः २९ माकंदकंदलः=चूतांकुरः ३० कलकंठः=कोकिलः ३१ विपंचिः=वीणा. ३२ वंजुलः=अशोकः ३३ केसरः=बकुलः ३४ विचारशून्यः=विचारयुक्तः पक्षिसंचारयुक्तश्च. ३५ गंधसारः=चंदनः ३६ मज्जा=सारः ३७ सरस्वति=सांगरे. ३८ चंचला=विद्युत्.

शोभाममुष्य वितनोति तवांगयष्टेर्माणिक्यखंडरचिता महतीव माला ॥ ६० ॥
चेष्टा लतासु ललितासु विलासिनीनां पोस्फूर्यते क्षितिरुहेष्वपि पूरुषाणां ॥
अन्योन्ययुक्ति[39]रनयोरधुना जनानां मन्ये मनस्त्वरयति प्रसभं रताय ॥ ६१ ॥
लक्ष्मीमिमामिह मधोरवरोधभूतां निध्याय[40]तो मम निरंकुशकौतुकस्य ॥
चित्तं विभेत्तुमधुना मदनः समिंधे सख्युः प्रियाय कतमे वद नोत्सहंते ॥ ६२ ॥
नारीगुणैरसि रतिस्त्वमतस्त्वदीये कामः करोति मयि कार्मुककौशलं तत् ॥
बाल्यात् परे वयसि यत्त्वयि दत्तदृष्टौ लक्षीकृताखिलयुवा समपीपदत्[41]सः ॥ ६३ ॥
उच्चावचाः सुमुखि संप्रति चित्तयोनेर्बाणा भवंति बहवः सुलभा वनेऽस्मिन् ॥
द्वेधा स लक्षयति मामिह जातमेकमासन्नमन्यदिति भामिनि भावयस्व ॥ ६४ ॥
निर्माय ते वपुरिदं कुसुमस्य सारैः शेषं शरार्थमददान्मदनाय वेधाः ॥
तत्तादृशेन वपुषांऽग मदंगमेत्संवर्मय स्मरशराः प्रतियांतु मोघाः ॥ ६५ ॥
सख्यः सरोजमुखि संप्रति दूरदेशे साकं चरंति रसिकैस्तपसे यतस्त्वं ॥
नेदिष्टमेतदपि पश्य निकुंजमस्मिन् कंदर्पदर्पशमनं करवाव किंचित् ॥ ६६ ॥
एतल्लतागृहसनीडी[42]कृतस्वनीडाः पारावताः परमसुंदरि तावकीनं ॥
कर्णामृतं सुरतकूजितमाकलय्य स्वां हुंकृतिं शिथिलयंतु निरूढलज्जाः ॥ ६७ ॥
निर्भिन्ननीरजरजःप्रकरप्रसंगादुद्गंधयस्तनुतुरंगनिदानभूताः ॥
मंदानिला मधुरवाणि रतक्लमोत्थं घर्मोदभारमपनेतुमलं क्षमंते ॥ ६८ ॥
इत्थं निशम्य दयितस्य वचः प्रियं तत् स्मित्वा मनागनुजगाद मुदा मृगाक्षी ॥
मुग्धोऽपि कांत जितं[43]चैत्ररथेऽत्र गत्वा नो विक्रियेत कतमः पुरुषोंगना वा ॥ ६९ ॥
नित्यप्रपुष्टधरणीरुहवल्लिजालं त्दृष्टद्विरेफपरपुष्टनिनादरम्यं ॥
सौवर्गयौवत[44]रहस्यकलाविलासस्थानं वनं तदतिशय्य विराजतीदं ॥ ७० ॥
आयातमत्र कुलमप्सरसां यदि स्यान्मन्येत नाम न तृणाय शिरांसि मेरोः ॥
पुण्यातिरेकनिजसात्कृतदेवभावैः पुंभिः समं विजरिहर्ति[45] सदैव यत्र ॥ ७१ ॥
धीरे भवत्यपि मनोभववैभवेन क्षीणे भवत्यमितरूपगुणाभिरामे ॥
का नाम कांत कथयस्व कथा वधूनां स्वाभाविकं भवति यत्र हि कातरत्वं ॥ ७२ ॥
कंदर्पसायकनिपीडितचित्तवृत्तिः सूक्तिस्रजं सृजसि यन्मयि सद्गुणाढ्यां ॥
प्रत्यर्पयामि तदिमां कुसुमस्रजं ते वाचा भवंतमनुवर्त्तितुमीश्वरः कः ॥ ७३ ॥
इत्यूचिषी जनकजा दयितस्य कंठे चिक्षेप तां सरभसं कुसुमस्य मालां ॥
एतावती शरतती रसिवल्लभेन क्षिप्ता मयि स्फुटमितीव निवेदयंती ॥ ७४ ॥

---

३९ युक्तिः=योगः ४० निध्यायतः=पश्यतः ४१ समपीपदत्=संपादयामास. ४२ सनीडं=समीपं. ४३ चैत्ररथं=कुबेरोद्यानं. ४४ सौवर्गयौवतं=स्वर्गांगनासमूहः ४५ विजरिहर्ति=अतिशयेन विहरति.

कांताकरेण गलसीमनि बद्धमाले तस्मिन् मनोभवगतिर्द्विगुणीबभूव ॥
आश्लिष्य तामथ जवेन कुचोपपीडं निन्ये निकुंजगृहमेष समीपवर्ति ॥ ७५ ॥
तत्रांतरे तरुणपल्लव[४६]संगतानां प्रत्यग्रविभ्रमवतां प्रमदाजनानां ॥
कामोदयेन चलतां विविधा बभूवुश्चेष्टा मरुद्गतिजुषामिव गुल्मिनीनां ॥ ७६ ॥
काचित् प्रियेण सहिता सहकारवल्लीबालप्रवालरचिते शयने निविष्टा ॥
तत्पाणिजाग्रमृदुकृष्टशिरस्यभारा[४७] रेमे चिरं रहसि नर्मकथाप्रसंगैः ॥ ७७ ॥
अग्रे विलोक्य रमणं रमणीयगात्री हस्तापचेयमपि कांचनपुष्पमन्या ॥
नो चक्षमे यदपचेतुमुदीतलज्जा तच्चित्तपंकजममुष्य जहार सद्यः ॥ ७८ ॥
रामां रिरंजयिषता रसिकेन यूना विश्राणितेषु विकचद्रुमकुड्मलेषु ॥
सा केवलं न हि ररंज विलोकयंत्या नेत्रद्वयांचलमपि प्रसभं सपत्न्याः ॥ ७९ ॥
अंतर्निकुंजमधितिष्ठति रंतुकामे कांते वधूरविदतीव गता सखीभ्यः ॥
अन्विष्यमाणकुसुमा सविलासमत्र प्राप्यामुना परिरराम चिराय काचित् ॥ ८० ॥
अंतर्हितग्रहणकेलिमिषेण कश्चिल्लीनो लतासु वनितापि गवेषमाणा ॥
तत्रागता सपदि वांछितमेष लेभे सापि न्यवर्तत सखीस्तदवीक्षिणीर्वै[४८] ॥ ८१ ॥

अंगुष्ठमात्रतलभूमितलावलंबां तुंगप्रसूनविनिवेशितपाणिपद्मां ।
योषामुपेत्य परिरंभरसेन कश्चिन्माभून्निपात इति तां जगृहे कराभ्यां ॥८२॥
उत्तानिताननमुदक्षमुदीक्षमाणा लक्ष्मीं तरोरुपरिजां क्षणमायताक्षी ।
सद्यः पतद्भिरदसीयरजोभिरंधा मंतूयता[४९]पि दयितेन मुहुश्चुचुंबे ॥ ८३ ॥
क्षिप्त्वा स्वयं मृगदृशः कुसुमं मुखेंदौ लग्नं परागमथ जातरुषापनेतुं ।
प्राप्यांतिकं विधमता मुखमारुतेन तत्सौरभानुभवसौख्यमलंभि यूना ॥८४॥
वर्णेन निर्जितसुवर्णगुणं सपत्न्याः कर्णावतंसयति कामिनि कर्णिकारं ।
अन्यापदेशवचनैरतिसूचितेर्ष्यैरन्या तदीयमपि कर्णमलंचकार ॥ ८५ ॥
रत्यामधःशयनमेव पणं भणंती पुष्पैः परस्परमभिप्रहितैः सलीलं ।
कांचिद्विजत्वतुरयापजितेन यूना साकूतसुस्मितमलोकि मुखं सखीनां ॥८६॥
व्याजेन दोषमभिनीय परागपाताज्जातं दृशोः स्खलितचारुपदं चलंती ।
विभ्रम्य काचन विवेश विदग्धनारी सख्याः पुरः कमितुरंकमजानतीव ॥८७॥
इत्यादिभिर्बहुविधैर्वनकेलिभेदैर्विभ्रम्य ताः श्रमपयःकणभूषितांगाः ।
योषाः समं प्रियतमैश्चितपुष्पभाराः प्रापुर्यतो रघुपतिर्दयिता च तस्य ॥८८॥
यावत्सुमानि तरुणैरुपहर्तुकामै[५०]रासाद्यते स्म सविधं न सहप्रियाभिः ।
तावत्पुरैव तरुमूलमनूषतुस्तौ बालानिलेन सुरतश्रममस्तयंतौ ॥ ८९ ॥

---

४६ पल्लवः=विटः किसलयं च. ४७ शिरस्यभारः=केशपाशः ४८ तदवीक्षिणी=तस्य अवीक्षिणी. ४९ मंतूयता=अपराधं कुर्वता. ५० उपहर्तुकामैः=उपहारं कर्तुमिच्छुभिः

तानग्रतो विनिहितप्रसवोपहारान् दृष्ट्वा ननंद नृपतिः स्मितसुंदरास्यः ।
तत्पुष्पसंचयमपि स्वयमेव भूयः कांताकचप्रकरभूषणमाततान ॥ ९० ॥
रेजुर्नृपेण निहिताः प्रमदोत्तमायाः केशेषु ताः सुमनसः प्रविकीर्णशोभाः ॥
सूर्यात्मजासलिलवेणिषु विस्फुरंत्यो व्यूहीभवंत्य इव कोमलशुक्तिपङ्क्यः ॥९१॥
भूयोपि तत्र भुवनैकमनोहरांगौ तौ दंपती सहचरैः सह सप्रमोदं ॥
वक्राभिधानपरिहासकथाप्रधानैरारेमतुश्चिरतरं बहुनर्मभेदैः ॥ ९२ ॥
तेषां वने विहरतामिह माधवश्रीशय्यागृहे जनितशंबरवैरिवारे ॥
कस्मै जनाय न चुकोप निसर्गवामश्चित्तं च कस्य न बिभेद शरैः[51] तीक्ष्णैः॥९३॥

इत्थं रामश्चिरतरमसौ सार्द्धमुर्वीशपुत्र्या ।
तस्मिन्नुद्यत्प्रसरमदने काननांते विहृत्य ॥
अस्तक्षोणीधरपरिसरं लंबमाने दिनेशे ।
प्रत्यावृत्तः सपदि सदनं प्राप कामातुरः स्वं ॥ ९४ ॥
याते तस्मिन्नथ नरपतौ वासतेयीं[52] स्वकीयां ।
सर्वे स्वं स्वं निवसनमनुप्रस्थिताः कामिनस्ते ॥
तुंगं शृंगं चरमधरणीधारिणः सोधिरोढुं ।
रूढोत्साहः पतिरपि रुचां संचुकोच स्वपादं ॥ ९५ ॥
इति श्रीरामचरिते महाकाव्ये पंचमः सर्गः ॥

---

अथावलोक्य स्वयमंबुजाक्ष्या रिरंसुमेनं रविरात्मवंश्यं ॥
तत्प्रीतिमाधित्सुरिवास्तमेप्यन्नु[53]पास्तशृंगं भगवानुपास्त ॥ १ ॥
निःशेषादिक्पालकलात्रिभूतेरस्येव दृष्ट्वा दयितानुरागं ॥
दिशोपि जाताः सहसा सरागाः स्वस्वामिभावोचितवृत्तिरेषा ॥ २ ॥
शिखाग्रलग्नैः शिशिरेतरांशोरारेजुराशामनगाः करौघैः ॥
कौसुंभकौशेयकृतैरभीक्ष्णमुष्णीषपट्टैरिव सावतंसाः ॥ ३ ॥
सायान्हशीतेन समीरणेन पतत्रिणः कंपितपत्रचूडाः ॥
आकाशमार्गेऽभिकुलायं[54] सालं मंदं विचेलुर्मधुरं रुवंतः ॥ ४ ॥
दिनांतरज्जद्द्युमणिप्रभाभिश्छन्नासु सर्वत्र हरित्स्वरोदीत् ॥
निजामजानन् निलयद्रुशाखां का केति पृच्छन्निव काकलोकः ॥ ५ ॥
पत्यौ निजे खेलति पश्चिमाशावक्षोजशैले विवृतातिरागे[55] ॥
द्रागब्जिनी द्रष्टुमिवासमर्था न्यमीलयत्पंकजमात्मनेत्रं ॥ ६ ॥

---

५१ सः=कामः ५२ वासतेयी=गृहं. ५३ उपास्तशृंगं=अस्तपर्वतसमीपदेशं. ५४ कुलायं=नीडं. ५५ रागः=रक्तिमा प्रीतिश्च.

आरुह्य तुंगं चरमाद्रिशृंगं तत्रत्यमाणिक्यरुचेव रक्तः ॥
आकुंचयन् पादसहस्रमाशु[56] पाथोधिमध्ये[57] पतितः पतंगः[58] ॥ ७ ॥
रत्नाकरोत्संगतरंगरंगे त्वंगत्क्षणं बिंबमशीतरश्मेः ॥
लीलाचलद्दोर्वलयाग्रभास्वन्माणिक्यशोभामभजत् प्रतीच्याः ॥ ८ ॥
अस्तंगते भास्वति संकुचंतीं सरोजमालामवलोक्य तस्य ॥
सौहार्दखेदादिव नेत्रयुग्मं मिमील संध्याविधिकैतवेन ॥ ९ ॥
सद्यस्त्रिलोकीजनवंदनीयां संध्यामुपास्थाय स राघवेंदुः ॥
सुधावलेपोज्ज्वलमभ्रगंगाकूलंकषं हर्म्यतलं प्रपेदे ॥ १० ॥
तत्रासने चारुणि सन्निविष्टः सत्रा[59] दुहित्रा मिथिलाधिपस्य ॥
नितांतशोणीकृतदिग्विभागां निरीक्ष्य संध्यामयमित्युवाच ॥ ११ ॥
विलोक्यतां विश्वविलासिनीनामनुत्तमे चित्तहरं जनानां ॥
महोमहत्वं महनीयशीले विलाससलोलेन विलोचनेन ॥ १२ ॥
शंकेतरां शोणितसिंधुपूरं संध्यामहःसंचयमंचितांगि ॥
परोष्णी[60]गतिभंगिभंगं[61] वीप्संतमंतं[62] वियदंडभांडं ॥ १३ ॥
कराभिघातेन कठोरधामा जनस्य पीडां जनयन् वृथैव ॥
कृतानुतापः कलुषं प्रमार्ष्टुं पुण्ये पयोधौ पतति स्म मन्ये ॥ १४ ॥
पतद्ग्रहत्वेन[63] कृतात्पतंगः पत्न्या जलेशस्य दिशा विहस्य ॥
तांबूलरज्जन्मुखसीधुदानादारक्तबिंबोजनि युक्तमेतत् ॥ १५ ॥
मन्ये जघन्यस्य* महीधरस्य शृंगाणि कालायसनिर्मितानि ॥
आसन्नवैरोचनदीप्तिदीप्तान्यासन्नमून्येव हि लोहितानि ॥ १६ ॥
आदाय लक्ष्मीमरविंदिनीनामस्तं गतोर्कः किल चोरभर्ता+ ॥
निपात्य तं दिग्वरुणस्य सिंधौ संध्यामिषात्तामियमाददाति ॥ १७ ॥
अभ्यर्णवाभ्यर्णमशीतधाम्नस्तीव्रातपैर्जाततृषः पिपासोः ॥
दिग्चक्रवालस्य विसार्यमाणा संध्येति संज्ञां लभते रसज्ञा ॥ १८ ॥
अस्ताद्रिपद्माकरचक्रचक्रे[66] तत्कालविज्ञातपतंगपाते ॥
सद्यो दिदीपे विरहानलः किं तज्ज्वालया शोणति वारुणीयं ॥ १९ ॥
रुचेरपाकृष्य रविः स्विकस्याश्वक्रेषु चक्रे पृथुतापभारं ॥
ददौ पुनस्तां दमुनस्यतस्ते[67][68] तपंति नक्तं न च तस्य भेदः ॥ २० ॥

५६ पादः=किरणः चरणश्च ५७ पाथोधिः=जलधिः ५८ पतंगः=सूर्यः ५९ सत्रा=सह. ६० परोष्णी=“ वडवागूळ ” इति महाराष्ट्रभाषायां. ६१ भंगः=वीचिः ६२ वीप्संत=व्याप्तुमिच्छंतं. ६३ पतद्ग्रहः=पतनग्रहः पात्रविशेषश्च (पिकदाणी.) ६४ सीधु=मद्यं. * जघन्यस्य=पाश्चिमस्य. ६५ अशीतधाम्नः=सूर्यस्य. ६६ चक्रचक्रं=चक्रवाकसमूहः ६७ दमुनासि=अग्नौ. ६८ ते=चक्रवाकाः + चोरभर्ता=जारः

हंसै[६९]: खगानां[७०]अधिपः किलायं चिराय संडीय परिश्रमार्त्तः ॥
पपात मध्येजलधीति जाने सांकूजिनं[७१] पक्षिगणः करोति ॥ २१ ॥
विधाय संगं वरुणस्य दारैर्दिशा सरक्तांबरया विशिष्य ॥
संध्याकुमारीं सविता ससर्ज ध्रुवं तदल्पागुरमौ बभूव ॥ २२ ॥
समंततः पश्यतमां[७२] तमिस्त्रं सुमध्यमे संप्रति जृंभमाणं ॥
विकस्वरेंदीवरकुड्मलौघादुदंचदुच्चैरिव कांतिजालं ॥ २३ ॥
कल्हारवापीकलिकाकरंडमुद्घाट्य संध्या मृदुवातयंत्रैः ॥
तत्र स्थितं भृंगकुरंगनाभि[७३]मादाय योषेव नु लिंपति स्वं ॥ २४ ॥
निर्वर्ण्य वर्णेन समानमेनं[७४] बिंबेन बिंबं च्युतमस्तशृंगात् ॥
भ्रमेण द्रष्टुं बलिपुष्ट[७५]लोकः समापतत्याशु तमिस्त्ररूपः ॥ २५ ॥
नेदं तमः किंतु कालिंदकन्या दिवा[७६] निरस्ते पितरि स्वकीये ॥
क्रोधादिवैनां[७७] ग्रसितुं प्रवृत्ता समंततः सत्वरमुत्पतंती ॥ २६ ॥
अब्धौ मृतेऽर्के हरितै[७८]: स्वनाथे संध्यानलं प्रापुरिवानुमर्तुं ॥
तद्दाहजन्मा तनुते रजन्यास्तमस्विनीत्वं तरसैव धूम्या[७९] ॥ २७ ॥
शीतालवः शीतकरांशुमर्शाद् भीता इवैताः ककुभो[८०] विदूरात् ॥
आच्छादनायाददते विशालं तमोमयं नीलनिचोल[८१]चेलं ॥ २८ ॥
अनेन भिन्नांजनमेचकेन[८२] कृत्वाक्षिलेपं खलु पेचकेन[८३] ॥
विश्वे पदार्था विषयीक्रियंते देहानुसारं बलमौषधानां ॥ २९ ॥
व्यक्तीभवंतं दिवि पश्य बाले तारासमूहं तमसावृतायां ॥
रूपांतराक्रांतनिजाश्रयत्वे रूपाश्रयं वस्तु सुलक्षमाहुः ॥ ३० ॥
रत्नं निजं नीरनिधौ नियत्या[८४] निपातितं या[८५] बहुशः शुशोच ॥
तस्या दिवो नेत्रपयःपृषंति[८६] तारापदेशात्प्रकटीभवंति ॥ ३१ ॥
दिनं दिनेशस्य करैः कठोरैः संतापितायाः सरणेः सुराणां ॥
मिषेण तारामयमौक्तिकानां प्रस्वेदबिंदुप्रकरा भवंति ॥ ३२ ॥
न्यस्तानि लक्ष्मीकमितु[८७]: पदत्वात्पुष्पाणि कल्पद्रुमजानि देवैः
दामानि[८८] यद्वा दिवि कीकसानां[८९] शंभोः कचत्वान्नतु भानि[९०] भूमनि ॥ ३३ ॥

---

६९ हंसः=पक्षिविशेषः सूर्यश्च. ७० खगः=पक्षी ग्रहश्च. ७१ सांकूजिनं=अतिशयाराव. ७२ पश्यतमां=अतिशयेन पश्य. ७३ कुरंगनाभिः=कस्तूरिका. ७४ एनं=सूर्यबिंबं. ७५ बलिपुष्टः=काकः ७६ दिवा=आकाशेन. ७७ एनां=दिवं. ७८ हरितः=दिशः ७९ धूम्या=धूमसमूहः ८० ककुभः=दिशः ८१ निचोलः=कंचुकः ८२ मेचकं=कृष्णं. ८३ पेचकः=उलूकः ८४ नियत्या=दैवेन. ८५ या=द्यौः ८६ पृषंति=बिंदवः ८७ लक्ष्मीकमितुः=विष्णोः ८८ दामानि=मालाः ८९ कीकसानां=अस्थ्नां. ९० भानि=तारकाः

सहस्रपादं वृषभं प्रचार्य क्षेत्रं नभो नाम विकृष्य कालः ॥
कृषीवलः कर्दमिते तमोभिर्वपत्यमुष्मिन्नुडु[11]बीजजालं ॥ ३४ ॥
स्फुटीभवत्कैरवकोरकाणां क्षपामुखे पुष्कर[12]पुष्करिण्याः ॥
बिंबानि दृष्ट्वा विमलांबुपूरे ताराधिपं तत्र तनोति लोकः ॥ ३५ ॥
उत्थाय संध्याकपटेन सिंधोरागंतुमालोक्य रुचामधीशं[13] ॥
दत्तार्चनस्तारकतंडुलौघैः प्रत्युज्जगाम ज्वलनः किमौर्व[14]: ॥ ३६ ॥
व्यक्तीभवत्तारतमिस्रमिश्रमशांतसांध्यप्रभमंबुजाक्षि ॥
मुदे ममोदेति रतांततांतत्वदाननश्रीधरमंतरिक्षं ॥ ३७ ॥
तारावलीराजतबिंदुराजत्पितृप्रसू[15]भासुरपत्रपाश्य[16]: ॥
वियद्द्विपस्तिष्ठति धारयिष्यन् सुधाकरं मध्यमणिं सुनीलः ॥ ३८ ॥
कालेन वैशाख[17]धरं विधाय प्रभाकरं बिंबममंथि सिंधुः
जज्ञे ततस्तारकरत्नकूटं तमिस्रनामापि च कालकूटं ॥ ३९ ॥
रत्नाचलश्चेद्वियदीपसंध्यं किं भासुरास्तत्र सुरा न ताराः ॥
इदं तमश्चाप्यभियुक्तमेभिर्जानीमहे दानववीरसैन्यं ॥ ४० ॥
सुवर्णशारीः कपटेन भानां विहायसि द्यूतपटे वितत्य ॥
विक्रीडितुं शीतमयूखमक्षं गृहीतुकामा इव भांति काष्ठाः ॥ ४१ ॥
संध्याप्रवालस्तिमिरच्छदौघो यस्तारकैः कोरकितो बभूव ॥
नभस्तरोरस्य न वक्ति को वा जनिष्यमाणं फलमिंदुबिंबं ॥ ४२ ॥
निधाय तेजो निजमुष्णतेजाः संध्यांगनायां जनयांबभूव ॥
निशाकुमारीं नितरां तदेषा वियोगभाजां विशिनष्टि तापं ॥ ४३ ॥
संध्यावधूसारसबंधु[19]योगे जाता निशा नाम कुमारिकेयं ॥
रथांगवक्षोरुहनेत्रनिर्यत्पयो[100] धयंती[1] परिपोषमेति ॥ ४४ ॥
निशीथिनी नीलतमःप्रवेणी कुमारिका कैरवकुड्मलाक्षी ॥
पीयूषभासा[2] परिणेष्यमाणा तारावलीमालिकयांचति स्वं ॥ ४५ ॥
इत्यत्र[3] सूक्तिस्रजमंबुजाक्ष्यै संध्यागुणौघग्रथितां ददाने ॥
आपांडुरः शक्रदिशि प्रकाशः क्षीरोदधेः पूर इवोज्जगाम ॥ ४६ ॥
रामांतरंग[4]प्रमदप्रदाता ताराधिपेन प्रहितो जवेन ॥

---

११ उडु=नक्षत्रं. १२ पुष्करपुष्करिण्याः=देवनद्याः १३ रुचामधीशं=सूर्यं. १४ और्वज्वलनः=वडवानलः १५ पितृप्रसूः=सायंसंध्या. १६ पत्रपाश्यः=ललाटभूषणं. १७ वैशाखधरः=मंथनदंड. १८ शारी="सोंगटी" इतिभाषायां. १९ सारसबंधुः=सूर्यः १०० पयः=उदकं दुग्धं च. १ धयंती=पिबती. २ पीयूषभासा=चंद्रेण. ३ अत्र=रामे. ४ रामांतरंगं=रामस्य स्त्रीणां च अंतरंगं.

अनुक्रमणिका

उत्पत्य च प्रागिगिरितो मरीचिस्तोमो हनूमानिव नाकमांचत् ॥ ४७ ॥
दृष्ट्वा मुखं दर्शितहासमैंद्र्याः प्रियः प्रियां तां पुनरप्युवाच ॥
निपीय तत्सूक्तिसुधामतृप्ता भूयस्तृषेवास्य चुचुंब याऽस्यं ॥ ४८ ॥
सलीलमालोक्य लोचनांतं प्राप्त प्रतीचीतरदिग्विभागं ॥
पूर्वाचलाग्रस्फुटलोध्ररेणुरम्या रुचः प्रेरयतीह चंद्रः ॥ ४९ ॥
सायं स्मरार्तैः सममात्मकांतैः प्रक्रीडितानां प्रथमाद्रिकुंजे ॥
आशामुखोयं शबरांगनानां श्वेतायते नर्मविलासहासैः ॥ ५० ॥
यथायथोदंचति कांतिरिंदोरनूदयंती हरिगोचराशां ॥
तथातथापैति तमिस्रजालं मायेव साक्षात्परचित्प्रकाशात् ॥ ५१ ॥
अर्द्धार्द्धदृष्टामृतरोचिरंगं मुग्धे पुरस्तादुदयस्य शृंगं ॥
आलोक्यतमास्यमिवाद्रिवृष्टेर्दिगंबरीभूतपिशंगदंष्ट्रं ॥ ५२ ॥
+उस्रैरुदस्तीकृतविप्रयुक्तैर्विस्रंसयन्नाशु तमिस्रबंधं ॥
*उल्लोलसंक्रांतविलोलमूर्तिरुद्याति सिंधोरुडुचक्रवर्ती ॥ ५३ ॥
पीयूषसारस्रविणा करेण विधाय संमार्जनमोषधीशः ॥
विलोपयत्येष दिवः शरीरे प्रायेण तारामयसिध्मजालं ॥ ५४ ॥
स्वच्छंदखेलत्प्रथमाद्रिमस्तवौस्तव्यहस्तोद्रकरैरुदस्तः ॥
प्रत्यग्रमाणिक्यशिलामयः किमुज्जृंभते संप्रति गंडशैलैः ॥ ५५ ॥
संध्याग्निसंतप्तनभःशरावे तारालिफेनानुमितद्रुताज्ये ॥
निधाय कालः पचतींदुपिष्टं निवेशितं प्राग्लवणोदपुरे ॥ ५६ ॥
कालेन पक्वस्तमसः कदाचिदाहारदानाय शशांकपूपः ॥
जग्राह सद्यस्तम एव सोयं वैधी विचित्रा भवति प्रवृत्तिः ॥ ५७ ॥
लीलां भुजंगोन्मदंदानशीलां वामामनःक्षोभकरीं वहंती ॥
सत्कीर्तिभास्वत्कृतगोकुलस्य मूर्तिर्विधोः कंसमुदं न कुर्यात् ॥ ५८ ॥
स्वर्वार्तिकैवर्तवरैरदृश्यैरुद्राश्मिजालप्रातिमुक्तमूर्तिः ॥
उत्कृष्यमाणो जलधेर्जनौघैः शंखः शशांकः समशांकि शंके ॥ ५९ ॥

---

५ प्राग्गिरिः=पूर्वाद्रिः महेंद्रपर्वतश्च. ६ प्रतीचीतरदिक्=पूर्वा. ७ हरिगोचराशा=पूर्वा. ८ आद्रिवृष्टिः=आश्विराहः ९ दिगंबरीभूतं=व्यक्तीभूतं. १० उडुचक्रवर्ती=चंद्रः ११ ओषधीशः=चंद्रः वैद्यश्च. १२ सिध्मजालं=" शिबें " इति महाराष्ट्रभाषायां. १३ मस्त=शिरः १४ गंडशैलः=महोपलः १५ तमसः=अंधकारस्य राहोश्च. १६ भुजंगः=सर्पः जारश्च. १७ दानं=अर्पणं खंडनं च. १८ वामा=स्त्री. १९ सत्कीर्तिना भास्वता सूर्येण कृतं गोकुलं किरणसमूहो यस्य सत्कीर्त्या भूषितं गोकुलं व्रजो येन. २० कंसमुदं=कं पुरुषं सहर्षं पक्षे कंसस्य आनंदं. २१ मुक्तमूर्तिः=आबद्धमूर्तिः. + उस्रैः=किरणैः. * उल्लोलाः=महोर्मयः.

The first, *Aparokshânubhuti*, is a work ascribed to Sankarâcl
the other is a *Râmâyana* by the famous Marathi poet Moropan
curious as showing, among other things, the same verbal inge
those which mark his Marathi poetry. This work has not yet
pleted.

Upon the whole, we trust we have said enough to show
publication is a very meritorious one, and deserving of the patr
all who take an interest in Sanskrit and Marathi literature an
history of India—especially the history of the Marathas. It is :
conducted on a scale smaller than is required by the nature of th
it deals with. At the present rate, it will take years before even
large number of *Bakhars* can be published. And the same thin
said of the large mass of Marathi literature which still remains u
As to Sanskrit, the call for such work is not urgent, because t
many other agencies at work directed to the publication of old
pieces. But as regards the other two departments, the publicati
us is almost the only one in the field. A few years delay, and
there will be no harvest to reap at all.

We have been informed, that the only difficulty in the way of
ing the size of the present publication is the vulgar one—money. V
that the public will patronize the work so as to get rid of this di
and we shall be glad if our notice serves to introduce the publica
the knowledge of a larger circle of readers than it commands at p

K. T. Telang.

---

# राजव्यवहार-कोश.

## [ किंमत कमी केली. ]

महाराष्ट्र भाषेंत जे मुसलमानी शब्द प्रचारांत आले आहेत ते एकत्र
त्यांस संस्कृत पर्याय देऊन एक कोश तयार करावा अशी आज्ञा श्री०
छत्रपति यांणीं केल्यावरून महाराजांचे प्रिय अमात्य जे रघुनाथ पंडित
त्यांणीं हा कोश निर्माण केला.

ह्याचे प्रथम प्रकाशक असें ह्मणतात कीं, "या कोशाची नुसती
केली तर हजारों संस्कृत शब्द मनांत ठसून, मराठी भाषेची प्रौढता
माहितगारी वाढेल यांत संशय नाहीं." आह्मांस तर असें वाटतें कीं, या
णीपासून संस्कृत व मुसलमानी ह्या दोन्ही ही भाषेंतील उपयुक्त शब्द—
उणीव हल्लीं फार भासूं लागली आहे असे—प्रचारांत येऊन आमच्या महारा
षेची बरीच उणीव दूर होईल. तसेंच संस्कृत व मराठी शिकणारांसहे
कोश उपयोगी होईल. तर महाराष्ट्रभाषेचे भक्त व स्वदेशाभिमानी लोक इ
दृष्टि पोंचवून आपला उदार आश्रय या कामास देतील अशी विनंती अ
पुस्तक सर्वांस घेण्यास सुलभ पडावें सबब याची मूळ किंमत कमी करून, टप
हांशील सुद्धां ०-३-० केली आहे. पुस्तकें **काव्येतिहास-संग्रह व्यवस्थाप**
आलीबाग जि० कुलाबा यांजकडे मिळतील.